*अवघे संपादिले सोंग*

*AVAGHE SAMPADILE SONG*




*मोबाईल : ९८२२ १६२१८१*

*विरोप पत्ता : vijaykachare@gmail.com*





***>>*** *प्रकाशक*

***ई साहित्य प्रतिष्ठान***

***मुंबई***

***>> मुखपृष्ठ : विश्वमंगल निर्मिती.***

***(सौजन्य : गुगल)***

***>> प्रकाशनः विजयादशमी, दि.११ ऑक्टोबर २०१६.***

*प्रिय मित्रवर्य डॉ.रमेश नारायण वरखेडे*

*हयास...*

*जीवाचं मैत्र जपण्याच्या तुझ्या  अलौकिक हातोटीस.*



*नटनाटये अवघे...संपादिले सोंग*

*भेद दाऊ रंग... न पालटे*

*मांडियला खेळ....कौतुक बहुरुप*

*आपुले स्वरुप ...जाणतसो*

*स्फटिकाची शिळा ...आधी न मिळे*

*भाव दावी ... पिवळे लालसंगे*

*तुका म्हणे आम्ही...या जनाविरहित*

*होऊनि निश्चिंत... क्रीडा करु*

*तुकाराम*

## पात्र परिचय

**रावसाहेब :** प्रतिष्ठित श्रीमंत असामी. अध्यात्म व रसिकता मिश्रित घरंदाज व्यक्तिमत्त्व

**बाईसाहेब :** रावसाहेबांची सुशील, प्रेमळ पत्नी.

**दिवाणजी :** रावसाहेबांच्या वाडयाचे दैनंदिन आर्थिक व्यवहार पाहणारे पिढीजात नोकर.

**महिपतराव :** रावसाहेबांचा भाचा.

**श्रीपती :** विक्षिप्त,कलंदर,प्रतिभावंत चित्रकार.

**वकील :** मृत्युपत्राचे व्यवस्थापक

**डॉक्टर :** फॅमिली डॉक्टर.

**अण्णासाहेबः** रावसाहेबांचे स्नेही आणि विश्वस्त.

**तात्यासाहेबः** रावसाहेबांचे स्नेही आणि विश्वस्त.

**नानासाहेबः** रावसाहेबांचे स्नेही आणि विश्वस्त

**धनाजी :** पिढीजात नोकर.

**संताजी :** पिढीजात नोकर.

# अंक पहिला

## प्रवेश पहिला

**(एका श्रीमंत जमीनदाराच्या भव्य वाडयाचा शोभिवंत दिवाणखाना. त्याची सजावट पिढीजात वैभवाला साजेशी. पडदा वर जातो तेव्हा दोन गडी आतून छोटया मोठया वस्तू आणून एका कोपऱ्यात रचून ठेवत आहेत. उदाहरणार्थ : रिकामा देव्हारा, पितळी समया, तस्बीरी, फुलदाण्या इत्यादी.जुन्या ग्रामोफोनवर पुढील रेकार्ड ऐकू येते :**

**खेळ मांडियला वाळवंटी घाई. ...नाचती वैष्णव भाई रे**

**क्रोध अभिमान केला पावटणी......एकएका लागतील पायी रे**

**हे गाणं चालू असताना वकील येतात. ते यादीबरहुकुम येणाऱ्या वस्तू तपासतात.दिवाणजी घाई घाईनं आतल्या खोलीतनं येऊन बाहेर जाऊ लागतात. त्यांच्या हातात एक नक्षीदार सुरई.)**

**वकील :** दिवाणजी, सारी मोजदाद होत आली एकदाची.

**दिवाणजीः** हो. झाली एकदाची. आता वाडयावरची माणसं अन्नाला मोताद व्हायची बाकी राहिली. बाकी काही म्हणा... जायदाद असावी तर अशी....

**वकील : (आपल्याच नादात )** कशी ?

**दिवाणजी :** अशी की,जी जाळली तरी चांगले दहाबारा दिवस नुस्ता धूरच कोंडून राहील आख्ख्या गावात. बाकी आसल्या इस्टेटीचं करायचं तरी काय म्हणा...

**वकील :(आपल्याच नादात )** काय करायचं?

**दिवाणजी :** अहो, रावसाहेबांच्या येवढया मोठया दौलतीला ना औरस वारसदार ना दत्तकाचा आधार....मग ती का जाळायची ?

**वकील :** जाळायची नाही?

**दिवाणजी :** नाही तर मग काय करणार हो जाळूनच टाकली पाहिजे एकदाची....

**वकील :** पण रावसाहेबांनी तशी इच्छा व्यक्त केलीच नाहीय मृत्युपत्रात....

**दिवाणजी :** आधी जाळून टाका ते तुमचं मृत्युपत्र!

**वकील :** माझं ?

**दिवाणजी :** तुम्ही कशाला कराल मृत्युपत्र! रावसाहेबांचं मृत्युपत्र म्हणतो मी...अगदीच जगावेगळं आहे ते... त्यानंच तर आपल्या सगळयांची झोप उडवली गेले आठ पंधरा दिवस....जरा माडीवर जाऊन ऐका.महिपतरावांची काय एकेक खलबतं चालली आहेत ती...

**वकील :** करू द्या त्यांना हवी तेवढी खलबतं. त्याचा काहीच उपयोग होणार नाही.सगळया बाबी कलमवार आणि कायदेशीर केल्या आहेत रावसाहेबांनी.वाहत्या गंगेत सगळयांसह तुमचेही हात धुतले गेलेच आहेत..

**दिवाणजी :** हो.. धुतले गेले ना हात. मिळणार आहेत आम्हाला चोख पंचवीस हजार रावसाहेबांच्या इच्छेनुसार ....पण आता या वयात नवी नोकरी शोधणं आलं. त्याचं काय? ती मिळंल सुद्धा....आम्ही काही तुमच्या कॉमर्स ग्रॅज्वेटसारखे नाही... इन्कमटॅक्सवाले झक मारतात आमच्या खतावण्यांपुढं... तसंच ते आर्ट ग्रॅज्वेट.. अहो, प्रेमपात्राला साधं प्रेमपत्र शुद्ध मराठीत लिहिता आलं तर शपथ..

**वकील :** प्रेमपात्राला प्रेमपत्र? हं... म्हणजे लव्हलेटर टू बिलव्हेड....

**दिवाणजी :** तेच अलिकडे इंग्रजीतनंच डोक्यात उजेड पडतो.पडेना का...पण लिहिण्यात कसलाच उजेड नाही.सगळाच अंधार...चार ओळीत सतराशेसाठ चुका...आणि अक्षराच्या बाबतीत बापूजींचा आदर्श....

**वकील :** म्हणजे ?

**दिवाणजी :** बापूजी म्हणजे महात्मा गांधी...त्यांचं ते दिव्य अक्षर..आमचं अक्षर पाहिलंत तर पाहात रहाल.... काय वाट्टंल ते लिहून घ्या ...प्यारपत्र, करारपत्र, मुखत्यारपत्र ...अगदी तुळशीपत्रसुद्धा......

**वकील :** तुळशीपत्र ?

**दिवाणजी :** हो... हो... तुळशीपत्रच ! जगातल्या सगळया मृत्युपत्रांना तुळशीपत्रच म्हणायला काय हरकत आहे, म्हणतो मी !! एवढी रावसाहेबांची गडगंज इस्टेट!! त्यांना मूल ना बाळ....सगळयांनी सांगितलं दत्तक घ्या... दत्तक घ्या....पण नाही ऐकलं त्यांनी.गेली चाळीस वर्षं पाहतोय ना.... या वाडयाचं शापित आणि भकास वैभव....दत्तक घेतला असता तर माझ्या पोटापाण्याची सोय तरी झाली असती मी मरेपर्यन्त. अशी तुमच्या मदतीनं या मोठमोठया याद्यांची तुळशीपत्रं लिहिण्याची पाळीच आली नसती माझ्यावर! **(हुंदका आवरतात.)**

**वकीलः** हलवायाच्या घरावर तुळशीपत्र ठेवताना रडणारा तुमच्या रूपानं पहिल्यांदाच पाहिला मी!! तरी मिळाले ना तुम्हाला पंचवीस हजार?

**दिवाणजी** : मात्र पंचवीस हजारच ना? अहो, तीस वर्षं सरकारी नोकरी करणारा साधा कारकूनसुद्धा पाच पन्नास हजार गाठीला सहज बांधतो.....जूमुक्त होताना....

**वकीलः** जूमुक्त? म्हणजे रिटायर्ड म्हणायचंय तुम्हाला.....

**दिवाणजी :** तेच.....इंग्रजीतनंच उजेड पडतो!!

**वकील :** तुमच्या त्या प्रेमपत्रांचं काय झालं ?

**दिवाणजी :** आता या वयात कसली प्रेमपत्रं आणि प्रेमपात्रं ! आमच्या तरूण वयात तीसुद्धा आम्ही रास्त

मोबदला घेऊन लिहून परभारे टपालात टाकली!

**वकील :** प्रेमपात्रांना प्रेमपत्रं !!अरे व्वा कुणाकुणाची?

**दिवाणजी :** असं पहा वकीलसाहेब, बँकेतल्या कारकुनानं कुणाच्या खात्यात किती रोकड आहे आणि कसायानं दावणीला किती बोकड आहेत याची चर्चा करायची नसते.....हाच शिरस्ता असतो प्रेमपत्रांचा आणि समस्त प्रेमपात्रांचा.....अहो, आम्ही प्रेमपत्रांचे तर्जुमे बनवले होते....फक्त रि.. का.. म्या..जा...गा......भरायच्या बाकी ठेवून.....

**वकील :** त्या कोणी भरायच्या?

**दिवाणजीः** तुमच्यासारख्यांनी...तुम्ही नाही का जोडप्यांची फक्त नावं बदलून घटस्फोटाची कागदपत्रं तयार करतात?

**वकील :** अच्छा!! म्हणजे तुम्हीसुद्धा ऐन वयात हे ...तसले उद्योग केले तर...

**दिवाणजी :** हो पण ....कधीही...कुठंही....केव्हाही.....वाह्यातपणा ....चावटपणा केला नाही...सगळं कसं प्रशस्त ... भारदस्त होतं त्या काळात....प्राणनाथ ...प्राणेश्वरी.....असले मथळे लिहावे लागायचे त्या काळात....आम्ही मनातल्या मनात म्हणायचो....

छायाम् अन्यस्य कुर्वन्ति, तिष्ठन्ते स्वयमातपे.....

**वकील :** आता हे काय नवीन आणखीन ?

**दिवाणजी : (भावूक होत जातात...)** संस्कृत आहे हे...इंग्रजीसारखं हेही डोक्यावरनं जाणार कोणाच्याही.वृक्ष इतरांना सावली देतात आणि स्वता मात्र भर उन्हात तळपतात, असं म्हटलंय संस्कृतात. वृक्षांच्या जातीची माणसंसुद्धा असतात जगात अनेक...आपले रावसाहेब त्यांच्यापैकीच एक.. सगळी जायदाद धर्मादाय करुन टाकली त्यांनी...जन्मभर आम्ही त्यांच्या सावलीला धरुन राहिलो.... मला, धनाजी, संताजीला काय मिळालं? काही हजारांची चिल्लर आणि लाखाच्या ऐवजातनं या वाडयात म्हणे वाचन मंदीर होणार आहे त्यांच्या मृत्युपत्रानुसार....खरंच, वकीलसाहेब परवा संध्याकाळी तुम्ही ते वाचलं... सगळयांच्या देखत आणि आम्ही ते ऐकलं सगळयांच्या समवेत...तेव्हापासनं हसावं की रडावं...हेच समजेनासं झालंय आम्हाला...

**वकील :** रावसाहेबांच्या जायदादीची व्यवस्था त्यांच्या इच्छेनुसार होणार यात शंका नाही. अरे हो, बरी आठवण झाली.सध्या आपला श्रीपती कुठं असतो हो ? त्याला कित्येक वर्षात पाहिलंसुद्धा नाही.समोर आला तर ओळखणारही मी त्याला.

**दिवाणजी** : असंल कुठं तरी गावातच...धुमकेतूच्या कुळातला आहे तो.रावसाहेबाच्या पश्चातही वाडयावर यायचा आणि तासंतास बोलत बसायचा बाईसाहेबांशी....महिन्यापूर्वी बाईसाहेब गेल्या त्याच्या आदल्या रात्री बराच वेळ बसला होता बरळत वाडयाच्या पायरीवर..

**वकील :** त्या श्रीपतीलाही........

**दिवाणजी :** हो ठाऊकआहे मला...तोही हिश्शेदार आहे आमच्यातला....हंऽ म्हणे 'तळं राखी तो पाणी चाखी.' रावसाहेबांनी हजार चांगल्या गोष्टी केल्या असतील, ढीग उदार होते ते...पण त्यांच्या जगावेगळया मृत्युपत्रानं सगळया आप्त नातलगांच्या इच्छांची अगदी धूळधाण झाली! आता हे म्हणजे गुंजेबरोबर सोन्यासारख्या माणसाला तोलण्यासारखंच नाही का? मला आणि त्या भिकारडया श्रीपतीला एकाच वजनानं तोलायचं म्हणजे कमालच नाही का? हे म्हणजे भरल्या रांगोळीवर शेणसडा टाकल्यासारखं झालं...

**वकील :** दिवाणजी,शांत व्हा..तुमचा त्रागा मी समजू शकतो....पण आता तो आवरुन सगळयांना सावरुन धरण्याची वेळ आहे.रावसाहेबांच्या संकल्पावर शेणसडा टाकण्यासाठी त्यांचेच भाचे महिपतराव टपून बसले आहेत..कदाचित् ते उभं रान पेटवून देतील आणि आपण सगळेच होरपळून निघू...आपला पक्ष एकच असंल तरच निभाव लागंल....

**दिवाणजी :** मी तुमच्याबरोबर राहीन.....

**वकील :** तुमचा विषाद मी समजू शकतो...तसंच रावसाहेबांचं मनुष्यस्वभावाचं ज्ञानही....ते म्हणायचे सर्वश्रेष्ठ ते अन्नदान....ते माणसाची हाव तृप्त करतं....कनिष्ठ म्हणजे संपत्तीदान....ते तृप्त न करता हाव वाढवतं... .बालभारती पुस्तकाचं मुखपृष्ठ पाहिलंय ना तुम्ही?

**दिवाणजी** : हो....आमच्या धाकट्या चिरंजीवाच्या अभ्यासाला आहे ते... तिसरीत आहेत तो.

**वकील :** त्या पुस्तकाच्या मुखपृष्ठावर बालभारती हातात धरलेले बहीणभाऊ आहेत...त्यांच्या हातात तेच ...पुन्हा त्याही मुखपृष्ठावरही तेच...

**दिवाणजी :** हं... ध्यानात आला तुमच्या म्हणण्याचा इत्यर्थ...फुकट मिळालेल्या पैशानं कोणाचंही पोट कधीच भरत नाही. हे खरंच आहे म्हणा. आता रावसाहेबाचा भाचा महिपतराव... घरचा गडगंज आहे पण रावसाहेबांच्या जायदादीवर डूख धरून बसलाय नागोबासारखा ! माडीवर महिपतराव सकाळपास्नं काय... काय.खलबतं करताहेत...कोण जाणे. न्यायालयात जाण्याचं शिजतंय म्हणे...त्यापेक्षा आम्ही बरे....

**वकील :** काय करायचं ठरवलंत तुम्ही..?

**दिवाणजीः** एवीतेवी घबाडच मिळणारच आहे..तेव्हा आमच्या उपवर कन्यकांचे हात हळदीनं पिवळे करण्यासाठी वापरु ...आमच्या मुली म्हणजे अगदी झेरॉक्स कॉपी आहेत एकमेकींच्या ! त्या स्थळप्रतींसाठी स्थळविचारणापत्रं लिहू...आणि त्यांची लग्नं झाली म्हणजे हऽरी हऽरी करत बसू....(जाण्यासाठी निघतात) एकूण काय...

तुका म्हणे उगे रहावे, जे जे होईल ते ते पहावे...

घरी जाऊन येतो आम्ही..

**वकील :** जा पण लवकर या...संध्याकाळी विश्वस्त मंडळाची सभा आहे. महिपतराव विश्वस्त नाहीत...

तरीही ते येऊन दंडेली करतील...आदळआपट करतील...रावसाहेबांचं मृत्युपत्र स्पष्ट, खणखणित आणि कायदेशीर आहे...

**दिवाणजी :** रावसाहेब असल्या बाबतीत ढिसाळघाई करणं शक्यच नव्हतं...महिपतरावाचा त्रागा व्यर्थ  होणार... पण आपल्याला मात्र 'आलीया भोगासी असावे सादर...' व्हावं लागणार!

**वकील : (हसत)** 'नसले धोतर.नेसावे पातळ....' असं वागावं लागणार ! काय? आम्हालाही विनोद जमतो की नाही?

**दिवाणजी :** जमतो तर... तुकारामाच्या अभंगाची चोरी कोणीही करतो अगदी हक्कानं....

**वकील :** चोरी तर तुम्हीही करताय....हे काय आहे हातात तुमच्या?

**दिवाणजी :** ही किनई सुरई आहे...रावसाहेबांनी आणली होती.. काश्मीराहून...घेऊन जा म्हणाले होते...पण जमलंच नाही.सकाळी एका कपाटात सांपडली...यादीत तिची नोंद झाली नव्हती.म्हटलं जावी घेऊन...तुमची काही हरकत नाही ना?

**वकील :** घेऊन जा...हवी आहे तर... जिथं आभाळच फाटलंय.रत्नमाणकांची खुलेआम चोरी होतेय... तिथं तुम्हालाही मोह व्हायचाच ...

**दिवाणजी :** तसंच काही नाही हं वकीलसाहेब,.....तसे आम्ही मुळातले अगदी निःस्पृह...रावसाहेब आणि बाईसाहेबांनी नको नको म्हणताना नाही नाही ते देऊ केलं पण ...आम्ही कधी कधी घेतलंसुद्धा नाही!

**वकील :** अस्सं...त्यामुळे ही सुरई म्हणजे दर्यामे खसखसच नाही का?

**दिवाणजी :** म्हणा बापडे....तुकारामानं म्हटलंय.... पिंडपोषकाच्या जळो ज्ञानगोष्टी.....

**वकील :** हे पहा, दिवाणजी...रावसाहेब आणि बाईसाहेब आज हयात नसले तरी वाडयातल्या काडीचीही वाताहत करण्याचा कुणालाही हक्क नाही.तुमचं हे असलं नेणं यापुढे मी खपवून घेणार नाही....समजलं? जाऊन या घरी तुम्ही..

**(दिवाणजी जातात. वकील यादी तपासण्यात मग्न. धनाजी,संताजी काचसामान घेऊन येतात.)**

**धनाजी:** ग्येला बघ त्यो...

**संताजी :** जायचाच बाबा...

**धनाजी :** लईच बिलंदर ...जातीचा....

**संताजी :** जाऊ दे रे बाबा....आपल्याला काय करायाचं?त्याचं त्याच्यापाशी...

**धनाजी :** द्येवा रे तुजी बी जागा चुकलासी...

**संताजी :** आरं ए...धनाजी. कामाकडं ध्यान हाई का नाई तुजं...तू बी जागा चुकलासी...

**धनाजी :** कश्याची रे?

**संताजी :** बगा हो वकीलसायेब याचं डोसकं..

**वकील :** काय झालं ?कोणाचं डोकं ? कुठं ?

**संताजी :** आता काय म्हनावं या धनाजीला...अवो त्यानं काचंच्या तसबिरीवर गरामफोनाच्या तबकडया म्होप ठिवल्या रचून....

**वकील :** अरेचा...खरंच की...धनाजी उचल...उचल त्या रेकार्ड्स....

**धनाजी :** चुकलंच बगा...पर वकीलसायेब.येक इचारु तुम्हास्नी..?

**वकील :** विचार ....काहीही विचार....

**धनाजी :** या येवढया म्होप सामानाचं काय करायचं म्हनतो, आमी...

**संताजी :** तुला पायजेल हाय का काई?

**धनाजी :** आरं, घरी न्हेऊनसनी उपेग तरी काय त्येंचा? सरपन म्हून सुदिक घरधनीन घेनार न्हाई.

**संताजी :** मंग ऱ्हाहू दे की इथंच....

**वकील :** या सगळया वस्तू....सामान इथंच राहणार आहेत...इथं आणल्या त्या केवळ मोजदादीसाठी...केवढा अमूल्य ठेवा आहे हा....शेकडो ग्रंथ.दुर्मीळ रेकार्ड्स....सुंदर चित्राकृती...

**धनाजी :** अवो पर वकीलसायेब सगळं म्हंजे होळीचंच धन हाय का न्हाई?

**संताजी :** अवो होळीअगुदरच समदी मान्सं पालता हात धरुन बोंबा मारतायेत रावसायेबाच्या नावास्नी...

**वकील :** हे बघा... तुम्ही तुमची कामं करा बघू मुकाटपणानं...

**(महिपतराव येतात.)**

**महिपतराव :** हां...हां.... वकीलसाहेब, त्यांच्यावर डाफरण्याचं काम नाही...या वाडयावरचे पिढीजात नोकर आहेत ते....तुमच्यासारखे उपरे नाहीत....तेव्हा तुम्हीच तुमचं काम करा आणि आम्ही आमचं काम करु......

**वकील :** तुम्ही तुमचं काम केलं तरी काहीच उपयोग होणार नाही त्याचा...

**महिपतराव :** ते ठरवणारे तुम्ही कोण?

**वकील :** आम्ही? रावसाहेबांच्या कायदेशीर मृत्युपत्राची अधिकृत अंमलबजावणी क र णा रे.....

**महिपतरावः** शेवटी अंमलदारच ना?.....बाकी तुम्ही तरी काय करणार म्हणा...मामासाहेबांच्या भवताली खंडीभर माणसांचा राबता होता...त्यांची वाट लावून वाट दाखवणारे तुम्हीच...

**वकील :** रावसाहेबांची इस्टेट काही वाटेवर पडलेली नाही....ती या वाडयातच राहणार आहे.

**महिपतराव :** आम्हीही काही वाटेवरचे वाटसरु नाही आहोत...वाडयातच राहणारे खानदानी पाटील आहोत...

**वकील :** ते तुमचं तुम्हीच ठरवा....खरंच खानदानी असाल तर आम्हाला सहकार्य कराल....

**महिपतराव :** हो....हो..... सहकार्य करु ना.पण त्याच्या अटी आमच्या असतील . नाही तर...

**वकील :** नाही तर....काय ?

**महिपतराव :** नाही तर... कोर्टाची पायरी...सगळया मालमत्तेचं भिजत घोंगडं करुन टाकू आम्ही.... त्याला काय लागतंय तुमच्यापेक्षा सवाई वकील मिळाला की काम फत्ते.....

**वकीलः** त्याचा काहीच उपयोग होणार नाही...रावसाहेबांनी राजीखुशीनं आणि अक्कलहुशारीनं केलंय मृत्युपत्र...संपत्तीच्या विल्हेवाटीची योजना कलमवार....

**महिपतराव :** बस्स....कितीवेळा ऐकवणार तेच ते.कान किटले सगळयाचे....

**वकील :** तुम्हाला उमज पडेपर्यंत... समज येईपर्यंत.....

**महिपतराव :** आणि ती आलीच नाही तर ?

**वकील :** तर नाइलाज होईल आमचा......

**महिपतराव : (वकिलांच्या पाठीवर थाप मारत)** वकीलसाहेब,नाइलाजावरही शेवटी इलाज असतोच.नाही का?....हे कोणीच कसं शिकवलं नाही तुम्हाला?

**वकील :** समजलं नाही तुमचं बोलणं....

**महिपतराव :** मनावर घ्याल तर समजंल...न घ्याल तर पस्तावाल.....

**वकील :** म्हणजे ?

**महिपतराव :** आजचं तुमचं सभेचं नाटक होऊन जाऊ द्या एकदाचं...मग बोलू......सविस्तर त्याआधी....

**वकीलः** त्या आधी काय ?

**महिपतराव :** एक करता येईल....मामासाहेबाचं मृत्युपत्र तुम्ही वाचलं...आम्ही ऐकलं...तुमच्यादेखत ते दस्तावेजही चाळले...त्यात त्यांच्याकडनं थोडासा गाफिलपणा झालाय .....

**वकील :** को ण ता ?

**महिपतराव :** मामासाहेबांनी आम्हाला मोठया उदार मनानं पन्नास हजार देऊ केले आहेत....

**वकील :** सत्यच आहे ते...शिवाय न्यायाला धरुनही आहे...त्यांच्या जिवंतपणी टिंगल टवाळी करण्या पलीकडं काय केलं तुम्ही? आणि तरीही....

**महिपतराव :** तो प्रश्न सध्या नाही...पन्नास हजार आमच्या दौलतजाद्यालासुद्धा पुरणार नाहीत... त्यामुळं तो आकडा योगायोगानं उजव्या कोपऱ्यात आलाय.. त्यापुढं तुम्ही फक्त एक शून्य बेमालूमपणे वाढवायचं....ज्यांनी मृत्युपत्र ऐकलं त्यांची तोंडं आम्ही आमच्या पद्धतीनं बंद करुन टाकू.... आहे काय त्यात?अं ?

**वकील :** अशक्य.......केवळ अशक्य.....

**महिपतराव :** शक्य आहे...सहज शक्य आहे...शून्य वाढवण्याची किंमत तुम्हालाही मिळंल..आमच्या साखर कारखान्याचा लिगल ॲडव्हायजर म्हणून तुम्हालाच नेमून टाकू..आणखी काय हवंय?

**वकील :** सत्यनिष्ठा हवी आहे... ती मिळेल का ? या तुमच्या प्रलोभनात?

**महिपतराव :** अलबत! जगात प्रलोभनाशिवाय आहे तरी काय ? सत्यनिष्ठेला धोका न देता एक शून्य वाढलं...पन्नासाचे पाच लाख झाले म्हणजे आमची झेड पी ची निवडणूक वरच्या वर होऊन जाईल...आम्ही निवडून आल्यावर मामासाहेबांचं नाव एखाद्या चौकाला नाही तर सभागृहाला देऊन टाकू....

**वकील :** आणि वाचन मंदिराचं काय ?

**महिपतराव :** ते ठेवा ...सध्या बासनात बांधून....मला काही विश्वस्त म्हणून घेतलं नाही मामासाहेबांनी....पण आहे त्या विश्वस्तांकडनं वाचन मंदीर स्थगित करण्याच्या हालचाली माझ्याकडे लागल्या..अहो वाचायला वेळ आहे कोणाला? बोला कबूल?

**वकील :** पण रावसाहेबांच्या इच्छेला डावलून....

**महिपतराव : (कठोर आवाजात)** तुमची ती नेहमीची रेकार्ड ऐकण्याचा कंटाळा आलाय आम्हाला...तुम्ही काही करणार आहात की नाही एवढंच हवंय.आम्हाला...आमचं म्हणणं तुम्ही मान्यच करायला पाहिजेल आहे.त्याला अल्टर्नेटच नाहीय दुसरा...विचार करायला हवा तेवढा वेळ घ्या. वाटांमधनं पळवाटा काढा.नाहीतर होणाऱ्या परिणामांना तोंड द्यायला सज्ज व्हा.सगळया विश्वस्तांसह....समजलं? निघतो आम्ही....

**(महिपतराव जातात. वकील सुन्न होऊन खुर्चीत बसकण मारतात.)**

**प ड दा.**

**(स्थळ तेच. रंगमंचावर काळोख. एका प्रकाशवर्तुळात रावसाहेब मूर्तीवत बसलेले.दुसऱ्या प्रकाशवर्तुळात एक कीर्तनकार. तो खालील अभंग म्हणतो..)**

धनवंतालागी...सर्वमान्यता आहे जगी
माता पिता बंधुजन ...सर्व मानिती वचन
जव चाले मोठा धंदा...तव बहिण म्हणे दादा
सदा शृंगारभूषणे...कान्ता लवे बहुमाने....
तुका म्हणे धन...भाग्य अशाश्वत जाण
जोडोनिया धन ....उत्तम व्यवहारे.
उदास विचारे....वेच करी

**(अभंग संपत असताना रावसाहेबांच्या हसण्याचा आवाज. तो शांत होताना अंधार . रावसाहेबांच्या आवाजात खालील अभंग :)**

नटनाटये अवघे...संपादिले सोंग
भेद दाऊ रंग... न पालटे
मांडियला खेळ....कौतुक बहुरुप
आपुले स्वरुप ...जाणतसो
स्फटिकाची शिळा ...आधी न मिळे
भाव दावी ... पिवळे लालसंगे
तुका म्हणे आम्ही...या जनाविरहित
होऊनि निश्चिंत... क्रीडा करु

**(पूर्ववत प्रकाश. आधीचेच नेपथ्य. संध्याकाळ. तात्यासाहेब आणि अण्णासाहेब बाहेरनं बोलत प्रवेशतात. आतल्या दालनातनं वकील आणि दिवाणजी)**

**तात्यासाहेब :** आपले महिपतराव आलेले दिसत नाहीत.....

**दिवाणजी :** गेले असतील बाहेर कुठंतरी....

**अण्णासाहेब :** आणि नानासाहेबही अजून आले नाहीत...

**दिवाणजी :** येतीलच इतक्यात...

**तात्यासाहेब:** ते आल्यावर सभेला सुरवात करु.महिपतरावालही सभेला बोलवायला हवं. तुम्हाला काय वाटतं ,वकीलसाहेब ?

**वकील:** त्यांचं नाव रावसाहेबांनी सुचवलेल्या विश्वस्तांच्या यादीत नाही...त्यामुळे बोलवण्याचा

प्रश्नच येत नाही .

**तात्यासाहेब:** ते ठीकआहे....पण रावसाहेबांचे भाचे या नात्यानं त्यांना बोलवायला हरकत नव्हती.... आपण त्यांना सल्लागार करुन घेऊ...ही योजना कशी वाटते अण्णासाहेब,आपल्याला?

**वकील :** हे पहा, तात्यासाहेब, तुम्हाला काय सुचयायचं असंल ते मला सांगा.मी मघाच स्पष्ट केलं महिपतरावांचा आज काहीएक संबंध नाही. आपण इथं पत्त्याचा डाव टाकायला जमलेलो नाही....

**(महिपतराव आणि नानासाहेब येतात .)**

**महिपतराव :** मग कसला डाव टाकणार आहात वकीलसाहेब तुम्ही ?

**वकील :** मृत्युपत्राच्या आतापर्यन्तच्या कार्यवाहीचा आढावा घेऊन पुढच्या कामाची रुपरेषा ठरवून.....

**महिपतराव:** ठरवा...ठरवा... हवं ते ...हवं तसं ठरवा...तुमचे एक विश्वस्त हे नानासाहेब दुपारपासनं आमच्याबरोबर होते...त्यांच्यावाचून काम खोळंबलं असंल म्हणून आम्ही त्यांना अगदी वेळेवर घेऊन आलो...निघतो आम्ही..

**तात्यासाहेब :** असं कसं महिपतराव ?तुम्ही थांबायला हवं....

**नानासाहेब :** हो ना...म्हणजे तुमच्याकडे साखर कारखान्याच्या मिटींगांचा अनुभव आहे.

**महिपतराव :** तुमच्या वकीलसाहेबांना मान्य आहे का हे?अण्णासाहेब काही बोलताहेत का पहा . सूज्ञ आहेत दोघंजण...मी म्हणतो...तुम्ही विश्वस्त मंडळीनी कागदी घोडे नाचवायला काहीच हरकत नाही. योग्यवेळी आम्ही हस्तक्षेप करुच.मुम्बईच्या एका बॅरिस्टरला फोन लावायचाय आम्हाला ...निघतो आम्ही..

**(महिपतराव जातात)**

**दिवाणजी :** कसं तिरपागडं... आहे बघा!! रावसाहेब नेहमी म्हणायचे,

उद्वेगासि बहु फाकती मारग.....

नव्हे ऐसे अंग माझे होते...

आता कोण यासी...... करणे विचार ,

तो देखा साचार ....पांडुरंग....

**अण्णासाहेब :** अहो.... पांडुरंगा.....सन्तलीलामृतातनं बाहेर या..जरा...

**नानासाहेब:** बाकी काही म्हणा....रावसाहेबांच्या सहवासाचा परिणाम वाडयातल्या किडामुंग्यांवरही झालाय खरा....

**तात्यासाहेब :** जिथं रावसाहेबच गाथा जगले तिथं इतरांची काय कथा ? गाथेत म्हटलंय ना...

सिंचन करिता मूळ ..वृक्ष ओलावे सकळ

नको पृथकाचे भरी..पडो एक मूळ धरी......

**वकील :** तात्यासाहेब,तुमचा टोमणा लक्षात आला..मूळ कोण आणि पृथक कोण हे लवकरच ठरंल.आजचं आपलं प्रयोजन सभेचं आहे...दिवाणजी, पहिला विषय काय आहे?

**दिवाणजी :** झालेल्या कामाचा आढावा घेणे..

**वकील :** ठीकआहे...मीच सांगतो तो...रावसाहेबांच्या निधनाला पाच वर्ष झाली.महिन्यापूर्वी बाई साहेबही वारल्या...आता रावसाहेबांच्या इच्छेनुसार त्यांच्या मृत्युपत्राची अंमलबजावणी सुरु केली....वाडयातल्या सर्व वस्तूंच्या याद्या तयार होत आल्या आहेत..आता लवकरच वाडयाचं रुपान्तर वाचन मंदिरात म्हणजे ग्रंथालय आणि वस्तूसंग्रहालयात करण्यासाठी पावलं उचलायची आहेत...त्यासाठी खर्चाची तरतूद करायची आहे. तसंच रावसाहेबांनी ज्यांना देणगीरुपानं रक्कम देऊ केली आहे, त्यासाठी बँकेशी पत्रव्यवहार करुन पैसे अदा करायचे आहेत.

**तात्यासाहेब :** गावाचं मागासपण लक्षात घेऊन तूर्तास दहा पाच वर्ष वाचन मंदीर उभारणं स्थगित ठेवावं असं मला वाटतं...

**अण्णासाहेब :** छे! छे!!असं करुन चालणार नाही...रावसाहेबांच्या इच्छेनुसार लवकरात लवकर त्यांच्या वर्षश्राद्धापावेतो वाचन मंदीर सुरु व्हायला हवं.

**तात्यासाहेबः** बाईसाहेबांच्या मृत्यूपर्यन्त तर आपल्याला त्यांच्या या संकल्पाची साधी कल्पनाही नव्हती...तशी पाच वर्ष गेलीच ना अशी आणखीन् पाच दहा वर्ष गेली तर काऽय बिघडंल?

**नानासाहेब :** वास्तविक पाहता...वाडयाची वास्तू महिपतरावांच्याच नावावरच करायला हवी होती....रावसाहेबांनी....सगळया गावाला असंच वाटतंय....

**वकील :** वाचन मंदिरासाठी आणखीन् पाच वर्ष थांबायचं म्हणजे इथं काही उरण्याची आशाच नको....वाडयाची पडझड सुरु झालीच आहे....मग काय...उंदीर घुशी आणि चोराचिलटांचा सुळसुळाट होईल...आताच कुणाचा पायपोस उरलेला नाही.....

**नानासाहेब :** मघाशी महिपतराव म्हणत होते......

**दिवाणजी :** काय म्हणत होते ?

**नानासाहेब :** हेच की ,त्यांच्या मामुली अटी आपण मान्य केल्या म्हणजे साखर कारखाना वाचन मंदिराला भरघोस देणगी देईल.....

**तात्यासाहेब :** अशा काय अटी आहेत त्यांच्या.....?

**नानासाहेब :** ते म्हणाले वकीलसाहेबांशी बोलले आहेत.. ते. ..

**अण्णासाहेब :** वकीलसाहेब, काय म्हणाले होते...महिपतराव ?

**वकील :** हे पहा.... आपल्याला त्याच्याशी कर्तव्य नाही....रावसाहेबांनी आखून दिलेलं वर्तुळच महत्त्वाचं....त्यात राहूनच आपल्याला काम करायचं आहे....ते व्हा.....

**तात्यासाहेब :** हा सरळ...सरळ....आमच्यावर अविश्वास आहे.......

**नानासाहेब :** ते काही नाही.....वाचन मंदिराचा निर्णय घेण्याआधी सगळया बाजूंनी विचारविनिमय व्हायलाच हवा.....

**तात्यासाहेब :** नाही तर आम्ही...सभेवर... बहिष्कार टाकू....

**दिवाणजी :** पांडुरंगा....कसं विपरित घडतंय रे बाबा....

जोडोनिया धन उत्तम व्यवहारे,

उदास विचारे वेच करी

या भावनेनं रावसाहेब जगले....आणि इथं आता धनापाठोपाठ मनंही मोडायला लागलीत. संध्याकाळ झाली...देवघरात जाऊन दिवा लावायला हवा....घरात आता बाईमाणूसही उरलं नाही...

**(दिवाणजी आत जायला वळतात तेव्हा श्रीपती प्रवेश करतो. गबाळा पोशाख. दाढीमिशा वाढलेल्या. भेदक डोळे.)**

**वकील :** कोण हवंय आपल्याला?

**दिवाणजी :** अहो, हाच तो आपल्याला हवा असलेला श्रीपती !!

**नानासाहेब :** आलाय ....अगदी.... वेळेवर...पैसे उपटायला....महिपतराव म्हणत होते....

**अण्णासाहेब :** काय म्हणत होते ?

**नानासाहेब :** हेच की...रावसाहेबांनी भलेही या कफल्लकाला पंचवीस हजार देऊ केले असतील ....पण विश्वस्तांनी त्याचा तारतम्यानं विचार करायला हवा...येवढे पैसे एकहाती, एकरकमी देणं म्हणजे........

**दिवाणजी :** असं पहा....मृत्युपत्र रावसाहेबांचं आहे.ते दानपत्र असलं तरी हवं तसं वळवायचं मुखत्यार पत्र त्यांनी आपल्याला दिलेलं नाही....

**तात्यासाहेब :** आम्हाला समजतंय सगळं...महिपतरावांनी श्रीपतीला साखर कारखान्यात नोकरी देऊ केली आहे....त्याचे पैसे आपल्याला बुडवायचे नाहीत...काही....द्यायचेच आहेत ते...

**दिवाणजी :** श्रीपती आणि नोकरी ?.....पांडुरंग.....पांडुरंग....!!

**तात्यासाहेब :** मला वाटतं....वकीलसाहेब...तुम्ही याबाबतीत महिपतरावांशी बोलायला हवं...हे असं मौन सोडावं...

**वकीलः** मौनच धरु नाही तर काय करु? तुम्ही दोघांनी ...रावसाहेबांच्या जायदादीची खिरापत करणं...चालवलंय...मी....काय....करावं....? एक लक्षात ठेवा...तुम्ही कितीही विरोध केला तरी मी प्राणपणानं मृत्युपत्राची अंमलबजावणी करणारच ही अगदी काळया दगडावरची रेघ समजा...

**तात्यासाहेबः** तुम्ही करा हो...तुमचे कोणी हात बांधलेत? पण मरणारा मरुन जातो...जगणाऱ्यांना

व्यवहार सुटत नाही !! त्यामुळे मूळ तत्त्वाला वेळ प्रसंगी मुरड घालायला हवी....येवढंच आमचं म्हणणं....

**दिवाणजी :** तात्यासाहेब,नोकर म्हणून रावसाहेबांच्याच पायाशी मी उभी हयात घालवली.... त्यांनी मलाही विश्वस्त केलंय....यात सगळं काही आलं.एवढयाच बळावर म्हणतो... रावसाहेबांची इच्छा डावलणं योग्य नाही...कारण नसताना बारा वाटा फोडून पाण्याचा अपव्यय करण्यात काय हंशील आहे?

**अण्णासाहेबः** दिवाणजींच्या बोलण्यात सारासार विचार आहे.त्या श्रीपतीलाही काही बोलायचंय असं वाटतं....

**वकील :** अरेचा, विसरलोच की...बोल रे बाबा बोल....

**दिवाणजी :** सगळयांच्याच बोलण्यानं पार भेदरुन गेलाय बिचारा.....

**नानासाहेब :** हंऽ बरी आठवण झाली...श्रीपती ,अरे तुला नोकरी मिळणार आहे साखर कारखान्यावर... करशील ?

**तात्यासाहेब :** आपल्या महिपतरावांना ओळखतोस ना तू ?

**वकील :** इतके दिवस कुठं होतास तू ?

**अण्णासाहेबः** अहो...बोलण्यासाठी वाक्यं जुळवतोय तो...त्यालाच बोलू द्या.आता...अलिकडं कोणतं चित्र काढलंस?

**श्रीपती :** आ..ता...या..वयात..काहीच...नको...मला...रावसाहेब गेले...बाईसाहेबही गेल्या आता.. काय... उरलंय... या...जगात....मला...हवंय...मी...रंगवलेलं...तैलचित्र!

**वकील :** तै..ल..चि...त्र ? को णा चं ?

**श्रीरंगः** रावसाहेबांचं!! त्यांना...मी.....साठाव्या..वाढदिवसाला...इथंच नजर केलं होतं .....

**दिवाणजी :** कधीच बोलले नाहीत...रावसाहेब तुझ्या त्या तैलचित्राविषयी....

**वकील :** या...याद्यांमध्येही नोंदवलेलं नाही...मी !

**अण्णासाहेब :** वाडयाच्या कुठल्याच भिंतीवर दिसलं नाही कधी !!

**तात्यासाहेब :** खोटंच बोलत असंल तो आपल्याला ब्लॅकमेल करण्याासाठी....

**नानासाहेब :** भ्रम झाला असंल त्याला...वयस्कर झाल्यामुळं....

**अण्णासाहेब :** अहो...त्यालाच बोलू द्या ना पुरतं...

**वकील :** काय रे श्रीपती ... हे सगळं खरं की खोटंखोटंच ?

**श्रीपती :** पूर्ण शुद्धीवर आहे मी. भानावर आहे मी. मला माझं तैलचित्र परत हवंय. बस्स. बाकी काहीच नकोय....आता काय उरलंय या जगात? मोराचा पिसारा झडलाय...मोर आणि मोरणी उडून गेले....तुम्ही पाहिलाय कधी मोर? पिसारा फुलविणारा मोर? नाच रे मोरा..आंब्याच्या वनात..नाही ...नाही...नाच रे मोरा..रावसाहेबाच्या वाडयात..**(विकट हास्य)** आता आम्हाला

खरोखरच..**(बेसूर आवाजात गातो)**

वृक्षवल्ली आम्हा सोयरे ..वनचरे...

पक्षिये सुस्वरे आळविती...

येणे सुखे रुचे एकान्ताचा वास...

नाही गुणदोष अंगा येत....

आकाश मंडप पृथवी आसन....

रमे तेथे मन क्रीडा करी...

चल ग राणी मळयात...

चाफ्याचं फूल तुझ्या वेणीत...

केला मातीचा पशुपती...

परी मातीसी काय महती....

शिवपूजा शिवासी पावे...

माती मातीमाजी सामावे... **(विकट हास्य)**

ऐकताहेत काय? पाहताहेत काय? कावळयांनो....माझं तैलचित्र बऱ्या बोलानं परत करा..**(ओरडत)** परत द्या म्हणतोय ना? मग परत येणं नाही.या..या वाडयात..आम्ही निघून जाऊ निजधामाला...तिथं बाईसाहेबही जाऊन पोचल्या..

**वकील : (अस्वस्थ होत)** दिवाणजी, आपल्या धनाजी संताजीला विचारा....त्या तैलचित्राचं...

**(दिवाणजी आत जातात.)**

**तात्यासाहेबः** मोठंच गंभीर प्रकरण दिसतंय...हे....भ्रमिष्टासारखं वागायचा आता बोलायलाही लागला.

**नानासाहेब :** बोलत नाही म्हणता म्हणता बरंच .. बोलला हा...शिव्याच दिल्या त्यानं...धक्के मारुन हाकललंच पाहिजे त्याला....

**अण्णासाहेब :** त्याला मी कित्येक वर्षापासनं ओळखतो...त्याचं बोलणं आपण परमार्थानं घेतलं पाहिजे.तो तुम्हाला म्हणजे तुम्हालाच कावळा नाही म्हणाला...

**नानासाहेब :** मग काय तुम्हाला म्हणाला?

**तात्यासाहेब :** नाना, कशाला शब्दानं शब्द वाढवता ? ते काळा कोट घातलेले वकील आहेत ना..त्यांना म्हणाला का...व..ळा... झालं समाधान?

**नानासाहेब :** मग आपण काय करायचं ?

**तात्यासाहेबः** आपण उगं राहायचं!जे जे होईल ते ते पहायचं!!आणि सगळं महिपतरावाच्या कानांवर घालायचं!!

**(दिवाणजी, धनाजी, संताजी  येतात.)**

**वकील :** काय हो... काही...तपास लागला का ?

**दिवाणजी :** नाही ना...धनाजी..संताजीलाही काहीच आठवत नाही...मलासुद्धा असं तैलचित्र पाहिल्याचं स्मरत नाही...

**धनाजी :** आवो....येवढी उस्तवारी केली सामानाची पर..त्ये चित्तर बित्तर काई गावलं न्हाई.

**संताजी :** आता आनकी कुटं सांदीकोन्यात ...कानाकोपऱ्यात...बखळ जागंत ठिवलं आसंल तर त्ये कसं गावायचं.... वो ?

**वकील :** कसून...कसूनच शोधलं पाहिजे ते....काय रे श्रीपती , प्रसंग वाढदिवसाचा होता..म्हणतोस.. आणखी काय...काय...आठवतंय...तुला ?

**श्रीपती :** त्या प्रसंगाचा रंग न् रंग...ढंग न् ढंग...ढंगाचे अंग न् अंग....

**(रंगमंचावर काळोख होताना )**

नटनाटये अवघे...संपादिले सोंग भेद दाऊ रंग... न पालटे
मांडियला खेळ....कौतुक बहुरुप आपुले स्वरुप ...जाणतसो
स्फटिकाची शिळा ...आधी न मिळे भाव दावी ... पिवळे लालसंगे
तुका म्हणे आम्ही...या जनाविरहित ....होऊनि निश्चिंत... क्रीडा करु

**प ड दा . अं क प हि ला स मा प्त .**

# अंक दुसरा

**प्रवेश पहिला**

**(वाडयातला तोच दिवाणखाना. आता सजवलेला. आंब्याच्या पानांची तोरणं. माणसांची वर्दळ. आज रावसाहेबांचा साठावा वाढदिवस. पुष्पहार गुच्छांची रास. सनईचे सूर मंदावतात.रावसाहेब गाथा वाचत आहेत....)**

**रावसाहेब : (वाचन शैलीत)**

आम्हा आपुले ....नावडे संचित
चरफडे चित्त....कळवळयाने
कळो आले बरे....उघडले डोळे
कर्णधार मिळे.... तरी बरे
न कळता झाला...खोळंबा मारगा
जगी झालो जगा... बहुरुपी
तुका म्हणे व्हाल...ऐकत करुणा
तरी नारायणा....उडी घाला....
ते माझे सोयरे...सज्जन सांगाती
पाय आठवती... विठोबाचे
येरा मानी ...विधी पालनापुरते
देवाची ती भूते...म्हणोनिया
सर्वभावे झालो ...वैष्णवाचा दास
करीन त्यांच्या आस ...उच्छिष्टाची
तुका म्हणे जैसे... मानती हरिदास
तैसी नाही आस ... आणिकांची

**दिवाणजी :** रावसाहेब, गावातली बरीच मंडळी आपल्या भेटीसाठी आली आहेत.

**रावसाहेब :** येऊ देत..येऊ देत...काय म्हणताहेत?

**(वकील येतात)**

**वकील:** अभीष्टचिंतन करण्यासाठी आलो. आज आपला साठावा वाढदिवस...

**रावसाहेब :** असू देत..असू देत..दिवाणजी,मंडळींच्या चहापानाचं पहा. हं, काय वकीलसाहेब? कशी चाललीय तुमची प्र्याक्टिस?

**वकील :** आपल्या आशीर्वादानं उत्तम चालली आहे..

**रावसाहेबः** ठीक...ठीक..तिला आता पळायलही शिकवा हेच वय आहे पैसे कमावण्याचं..विशी विद्या तिशी धन हेच खरं बरं का! सचोटी ठेवा.मग तो जगजेठीही तुमच्या पाठीशी आहे.

**वकील :** आणि आपले आशीर्वादही हवेत...

**रावसाहेब :** कसलं.कसलं.कर्ता करविता तो आहे..एकदा सवड काढून वाडयावर या...आमच्या जमिनीच्या कटकटी तुम्ही मिटवत आणल्या आता देहाच्या कटकटीही आटोपत्या घ्यायच्या...

**वकील :** म्हणजे ?

**रावसाहेब :** आता परलोकगमनाची तयारी केलेली बरी...आम्ही एकुलते म्हणून वावरलो जन्मभर... आता आमच्यानंतर पूज्य...तसंच आम्ही ठरवलंय... म्हणून दत्तकाच्या भानगडीत पडलो नाही..आता मृत्युपत्राच्या तयारीला लागायला हवं..आमच्या पश्चात सौभाग्यवती राहिल्या तर त्यांची व्यवस्था लावून ठेवायला हवी..

**वकील :** पण रावसाहेब, आजच्या मंगल प्रसंगी हे.. हे..अनिष्टचिंतन कशासाठी?दत्तकाचा विचार अजूनही करता येईल....

**रावसाहेब :** छे..छे..वकीलसाहेब,ते शक्य नाही.आम्ही आपल्या हातानं ते खिंडार कधीच लिंपून टाकलंय.. तुक्याच्या गाथेवर आमचं मन पोसलंय...तेव्हा...निवृत्ती म्हणजे पूर्ण निवृत्ती हवीय आम्हाला. पिढीजात रक्ताच्या नदीला परका ओहळ जोडून काय उपयोग? पाटीलकीच्या रक्ताचं अस्तित्व संपवायला सजलो आहोत आम्ही..

**वकील :** आपल्या ठाम निर्धारापुढं कोणाचं काय चालणार? येईन.सावकाश वाडयावर...तेव्हा बोलू.. आता निघू?

**रावसाहेब :** का ..का...घाई कसली ?

**वकील :** कोर्टात जायचंय..

**रावसाहेब :** मग निघा...मग निघा...चांगली तयारी करत जा हो प्रत्येक केसची..तुमची चूक म्हणजे अशील दोन हात वर टांगला जायचा आणि डॉक्टरची चूक म्हणजे रोगी दोन हात खाली गाडला जायचा....डॉक्टर कुठं आहेत ?

**दिवाणजी :** आले आहेत ते...आत बाईसाहेबांची प्रकृती तपासताहेत..

**रावसाहेब :** वकीलसाहेब, निदान पेढे तरी घेऊन निघा...साठ वर्षांचे झालो ना आम्ही...साठी बुद्धी नाठी....आणि येईल त्याला पेढे वाटी....काय? खरं ना?

**(वकील हसत जातात,)**

**दिवाणजी :** रावसाहेब, बाहेर अण्णासाहेब, तात्यासाहेब आणि नानासाहेब आले आहेत....

**(सर्वजण येऊन पुष्पहार घालून चरणस्पर्श करतात..)**

**रावसाहेब :** हं..हं.. या..या.. बसा..अण्णासाहेब...फार दिवसांनी भेट होते आहे...

**अण्णासाहेब :** नोकरीच्या निमित्तानं बाहेरगावी होतो ...ती आता संपली! आता समाजसेवा आणि हरी...हरी....

**रावसाहेब :** पुढं काय करायचं योजलं आहे तुम्ही ?

**अण्णासाहेब :** सर्व जातीधर्माचं वधुवरसूचक मंडळ स्थापन करायचं चाललंय...

**रावसाहेब :** वा..वा..कल्पना चांगलीच आहे. आमच्या महिपतीचं नाव नोंदवून घ्या...अलबत...त्याला विचारुन... हां..आजचा दिवस साठीच्या साठीच जाणार ...सावकाश या वाडयावर...तेव्हा बोलू सविस्तर......

**(अण्णासाहेब जातात.)**

**तात्यासाहेब :** रावसाहेब,...आम्ही ग्रामस्थ, विश्वमंगल भजनी मंडळ आणि संकल्पित विठ्ठल मंदिराचे विश्वस्त या नात्यानं आपल्याला शुभेच्छा द्यायला आलो आहोत...

**नानासाहेबः** तात्यासाहेबांच्या सूचनेला आमचं सगळयांचं अनुमोदन आहे...

**(दोघेही बसतात.)**

**रावसाहेब :** तुमच्या शुभेच्छा मिळाल्या .. पण हे काय ..हार मात्र एकच ?

**तात्यासाहेब :** त्याचं काय आहे....सगळयाच संस्थांची आर्थिक स्थिती.....

**रावसाहेब :** असू दे...असू दे.आम्ही जरा गंमत केली तुमची. तसं या हारतुऱ्यांचं काहीच प्रयोजन नव्हतं हो...आता आम्हीच गावातल्या सगळयाच संस्थांना छोटयामोठया देणग्या देणारच आहोत. आमचे दिवाणजी पोच करतील त्या.

**नानासाहेब :** असाच,,,असाच,,, कृमालोभ हवाय आमच्यासारख्या कार्यकर्त्यांना ...

**तात्यासाहेब :** या सूचनेला मी अनुमोदन देतो...

**रावसाहेबः** हे.हे.काय असतं आणखीन? दिवाणजी, मंडळींना आत नेऊन चहापाणी द्या..

**(सर्वजण जातात. डॉक्टर येतात.)**

**डॉक्टर :** नमस्कार ..रावसाहेब...अभीष्टचिंतन !!

**रावसाहेब :** थॅनक्यू. थॅनक्यू. आता आम्हालाही हे नवे शिष्टाचार अंगवळणी करायला हवेत. हं. काय म्हणते आमच्या कुटुंबाची तब्येत?

**डॉक्टर :** तसं काळजीचं कारण नाही. दोन दिवसांच्या श्रमानं रक्तदाब थोडा वाढलाय...बाईसाहेबांना किती सांगितलं की विश्रांती घ्या...पण ऐकण्याचं नाव नाही..

**रावसाहेब :** अहो...आता हे असंच चालायचं!!

पडिले वळण इंद्रिया सकळ...

चार दिवस वाडयावर धूम आहे...पाहुणे मंडळी आली आहेत..तेव्हा....

**डॉक्टर :** हो...पण तुम्ही दोघांनीही प्रकृतीकडं दुर्लक्ष करुन चालणार नाही...

**रावसाहेब :** आता हे असंच चालयचं.आम्ही नवराबायको म्हणजे कललेल्या दोन भिंती....पहिली कधी कोसळंल कोणास ठावकी?

**डॉक्टर :** पुरे करा...रावसाहेब...आज वाडयावरचा केवढा मंगल दिवस...तुम्ही असलं अभद्र मनात तरी का आणता ?

**रावसाहेब :** ते नाही...नाही म्हटलं तरी येतंच..बहिणाबाई म्हणते नाः

मन वढाय..वढाय...उभ्या पिकातलं ढोर..

किती आवरा ..आवरा..फिरी येतं पिकावर....

ते असू द्या. पुढल्या महिन्यात आम्ही देहू, आळंदी.पंढरपुरास जायचं म्हणतोय.

आपली प र वा न गी?

**डॉक्टर :** ती मिळंल ...आधी आजची तपासणी...

**(रक्तदाब तपासतात.)**

**रावसाहेब :** काय म्हणतोय... आमचा देह....?

**डॉक्टर :** अगदी नॉर्मल...ओ के..यापुढं तुम्ही राग,संताप,उद्वेग टाळला पाहिजे...

**रावसाहेब :** टाळतच चाललो आहोत आम्ही ....पण लोक आम्हाला कवटाळतात..कोणी मदत मागतं ..गाऱ्हाणं मांडतं...आम्ही अजातशत्रू !!म्हणजे कोणाचे तरी शत्रूच...

**डॉक्टर :** असं कसं ? आख्ख्या गावानं तुमचं मोठेपण आनंदानं मान्य केलंय..कालचाच तुमचा जाहीर सत्कार..अतिशय देखणा समारंभ झाला.केवढा उत्साह..त्यावरनं तुमच्या कामाच्या व्यापाची....

**रावसाहेब :** आता सगळा व्याप संपंल ही तुमच्यासाठी आनंदाची बातमी...म्हणजे आम्ही सर्व पदांचा त्याग करायचा ठरवलंय...दिवाणजी त्यागपत्रं लिहिताहेत...

**डॉक्टर :** वा....उत्तमच...अगदी दुधात साखर...

**रावसाहेब :** हां..हां...साखर नको!! मधुमेहही आहे ना आम्हाला...हवं तर सॅकरीन घाला..नाही तर ..टोचाल इन्शुलिन..

**डॉक्टर :** चेष्टा करता का डॉक्टरची ?

**रावसाहेबः** चेष्टा नाही हो..कालपासनं डोळयांसमोर तिन्हीसांजेची वेळ उभी राहते...मावळती सूर्यकिरणं काश्मीरला पाहिली..कन्याकुमारीला अनुभवली...जवानी होती...तेव्हा मनाचं कमलपुष्प मिटत नसे...काल संध्याकाळी व्यासपीठावरनं सूर्यास्त पाहिला आणि मनात संकल्प केला.आता जाहीर सभांमधे लुडबुडायचं नाही. महत्त्वाच्या जागा अडवायच्या नाहीत. तुक्याच्या गाथेला क्षणभरही सोडायचं नाही.तसंच कोणाचीही चेष्टा करायची संधी सोडायची नाही...

**डॉक्टर :** त्याला फॅमिली डॉक्टर म्हणून पुस्ती जोडतो..तुमचं आणि बाईसाहेबांचं पथ्यपाणी मोडायचं

नाही.... कबूल?

**(संताजी येतो.)**

**संताजी:** रावसाब ,भायेर शिरीपती पेनटर आला हाय..धाडू का त्येला आत?

**रावसाहेब :** पाठव...आज सगळयांना मुक्तद्वार आहे.

**(संताजी जातो. बाईसाहेब येतात.)**

**डॉक्टर :** तुम्हाला आत पडून रहायला बजावलं होतं ना मी?

**रावसाहेब :** तुम्ही लाख बजावाल ....पण ते जमलं पाहिजे ना ?

**बाईसाहेब :** पडून पडून हाडं टोचू लागली भुईला...आज येवढा भाग्याचा दिवस..पण मला मेलीला सुचतच नाही..सकाळपासनं..घरभर पावण्यांची वर्दळ...त्यांच्या सरबराईचं पहावं लागतं...

**रावसाहेब:** पहा.पहा.तुकोबानं एक आवा रंगवली आहे ना.

आवा चालली पंढरपुरा.

वेशीपासून आली घरा..

परिसे ग सूनबाई........

आपल्याला सूनबाई नाही.बाकी काडीमात्र फरक नाही...तितकंच संसारात चित्त!

**बाईसाहेब :** येवढं नको हिणवायला...सुना ,जावई आपल्या नशिबातच नाहीत...पण सग्यासोयऱ्यांचा गोतावळा कमी नाही.. मग जखमा तरी कशाला चिघळायच्या? म्हणते मी.

**(डॉक्टर जायला निघतात.)**

**डॉक्टर :** मी निघतो...रावसाहेब,त्यांच्या वर्मी लागंल असं बोलणं सोडा आता!

**रावसाहेब :** हे असंच चालत आलंय बघा...अरे.विसरलोच. हे आमच्या साठीचे पेढे!! तुमच्या साठीसाठी....

**डॉक्टर :** धन्यवाद....बरंय....

**(जातात.)**

**बाईसाहेब:** अनायशा पोटी सकाळपासनं बाहेर येऊन बसलात.जरा आत चलावं..निदान फुलपात्रभर दूध अन् फळं तरी खावी..येताय ना?

**(श्रीपती येतो. त्याच्या हातात कापडात गुंडाळलेले तैलचित्र. तो बराच वेळ दोघांकडे टक लावून पाहतो. बाईसाहेब आत जायला वळतात.)**

**रावसाहेब:** ये...ये...श्रीपती ...फार दिवसांनी आलास वाडयावर **(जाणाऱ्या बाईसाहेबांना)** तुम्ही व्हा पुढं...मी येतोच...आणि या श्रीपतीला ठेवून घेतो जेवायला...थांबशील ना रे?

**श्रीपती :** ...........

**(बाईसाहेब जातात.)**

**रावसाहेब :** काय...काय.. चाललंय अलीकडं तुझं ? मारोतीच्या देवळातली चित्रं रंगवलीस?

**श्रीपती :** हो..हो...

**रावसाहेब :** एकदा पहायला येईन मी..

**श्रीपती :** नाही.....तुम्ही पाहू नयेत ती....

**रावसाहेब :** का ?....का ?

**श्रीपती :** उत्तम वठली नाहीत ती ...

**रावसाहेब :** अस्सं का ?

**श्रीपती :** तिथं मी अप्सरांना पंख दाखवलेत....

**रावसाहेब :** मग त्यात काय वाईट आहे? पुराणात असतात असल्या गमतीजमती...

**श्रीपती :** गंमत म्हणून नाही....

**रावसाहेब:** मग ?

**श्रीपती :** मला वाटलं तसं....स्वप्नात दिसलं होतं....

**रावसाहेब :** काय दिसलं ?

**श्रीपती :** सगळी मानवजात कुरुप झाली आहे...

**रावसाहेब :** आणि तू ?

**श्रीपती:** मी सोडून...

**रावसाहेब :** आणि मी ?

**श्रीपती:** तुम्हीसुद्धा कुरूपच..

**रावसहेब :** आणखी काय...काय..दिसलं?

**श्रीपती :** सगळया बायका सुस्वरुप झाल्या आहेत....

**रावसाहेब :** आणि पंख फुटलेल्या....खरं ना? म्हणून तू बायकांची चित्रं मनापासनं काढतोस...असंच ना?

**श्रीपती:** हो...हो....

**रावसाहेब :** तिकडं गावाकडं तुझी बायको असते ना?

**श्रीपती :** असावी ....वीस वर्षात तिच्याकडं गेलोच नाही....

**रावसाहेब :** आता...तिलाच इकडं बोलावून घेतलं पाहिजे.....

**श्रीपती :** का? कशासाठी?

**रावसाहेब :** बायका किती कुरुप असतात हे तुला नीट कळावं यासाठी !! **(हसतात.)**

**श्रीपती :** नको...नको.....

**रावसाहेब :** का रे? घाबरतोस की काय तिला ?

**श्रीपतीः** नाही. मला ती आवडत नाही.. जी मला आवडते तिला तसं सांगण्याचा धीर होत नाही.. एक्टाच बरा आहे...

**रावसाहेब :** कोण आहे ती तुझी 'सपनोकी रानी?' ऑ ? धूमकेतूसारखं केव्हाही...कुठंही हिंडता येतं...खानावळीत जेवता येतं म्हणून .. म्हणून तू बायकोला टाळतोस. असंच ना?

**श्रीपती :** तसंच नाही काही...

**रावसाहेब :** तुझं ते सूर्योदयाचं चित्र मी परवा मुम्बईच्या प्रदर्शनाला पाठवलं....

**श्रीपती :** चांगलं केलं....अजून बरीच चित्रं काढायची आहेत...

**रावसाहेब :** कोणती काढशील ? विषय काय घेशील ?

**श्रीपती :** पुत्रजन्माचा....

**रावसाहेबः** व्वा...छान!!

**श्रीपती :** हो....एक सुस्वरुप बाई...तिच्या वेणा रंगातनं जाणवतील आणि जन्माला येणारं मूल ...बेढब...काळंकुट्टं....

**(हसत सुटतो.)**

**रावसाहेब :** हे.. हे,,,काय,,,आणलंस? काखेत मारून...

**श्रीपती :** तैलचित्र...आपलं....

**रावसाहेब :** माझं ?दाखव बघू...

**श्रीपतीः** तुमचं आहे....तुमचंच झालंय...तुम्हीच पहा....मी कशाला दाखवू?

**(धनाजी येतो.)**

**रावसाहेब :** काय रे धनाजी ?

**धनाजी :** भायेर गावातली मंडळी आलीयत.....

**रावसाहेब :** त्यांना संध्याकाळी यायला सांग.खूपच थकलोय मी...

**(धनाजी जातो. रावसाहेब तैलचित्र उलगडून बघतात. ते प्रेक्षकांना दिसत नाही. त्यांच्या चेहऱ्यावरचे भाव झरझर बदलतात. ते अस्वस्थ होऊन येरझारा घालू लागतात. मधेच थबकतात. श्रीपती मख्खासारखा उभा.)**

**रावसाहेबः** ठीकआहे...ठीकआहे...स्वीकारलं आम्ही हे तैलचित्र!! बस्स.आणखी काही? खर्चासाठी पैसे हवे असतीलच..दिवाणजीकडनं घे...आत जाऊन जेवण कर...मग जा..

**(श्रीपती आत आणि रावसाहेब तैलचित्र आच्छादून माडीवर जातात.)**

**(दुसऱ्या दारातनं दिवाणजी,धनाजी आणि संताजी येतात.)**

**दिवाणजी :** चला रे...मला मदत करा...बघू...

**धनाजी :** कायची जी ?

**संताजी :** काय वो?...हयी शष्टी म्हनजे नेमकं काय वो?

**दिवाणजी :** म्हणजे सा..ठा..वा..वाढदिवस! कालच झाला नाही का आपल्या रावसाहेबांचा?

त्या निमित्तानं येवढी पत्रं आणि तारा आल्या...

**संताजी :** तारा? कोनाची कोन हो ही?

**दिवाणजीः** तुझ्या या का...का...ची...ती...का..कू...!!

**(दिवाणजी पत्र आणि तारा चाळून एकेकाच्या हातात देऊ लागतात. महिपतराव येतात. हातात पुष्पहार.)**

**महिपतराव :** दिवाणजी, मामासाहेब कुठं हायेत ?

**दिवाणजी :** माडीवर आहेत..येतीलच इतक्यात खाली..

**महिपतराव :** मामीसाहेबांची तब्येत काय म्हणते ?

**दिवाणजी :** आज पुष्कळच बरं वाटतंय त्यांना...बसा ना...धनाजी,पाणी आण आतनं...तो गठ्ठा

ठेव संताजीजवळ....

**महिपतराव :** कसला गठ्ठा?

**दिवाणजीः** कालच्या कार्यक्रमाचा ..अभीष्टचिंतनाच्या तारा आणि पत्रं यांचा..

**महिपतराव :** अरे व्वा!! मामासाहेबांची लोकप्रियता अजून टिकून आहे. त्यांच्याबरोबरचे काही संपले तर

काही खपलेसुद्धा !!

**(माडीवरनं रावसाहेब येतात.)**

**महिपतराव :** नमस्कार करतो मामासाहेब..**(पुष्पहार घालून)** आजच सकाळी पेपरात आपल्या साठाव्या

वाढदिवसाची बातमी वाचली आणि तस्साच निघालो मोटारसायकलवरनं. तडक इथं...

**रावसाहेब :** पत्र पत्रिका मिळाली नाही?...छान..छान..उनाडक्या करण्यातच वेळ दवडता तुम्ही..जरा

जबाबदारीनं वागायला शिका... कोणाच्या कुरापती काढून आम्हाला छळू नका आता..

थकलो आता आम्ही.... सांभाळून चालवत जा ती फटफटी....

**महिपतराव :** अगदी सांभाळूनच चालवतो मी...

**रावसाहेब :** ठीक. ठीक..मामीला भेटलात ? जा..आत...जा...भेटा आणि जेवूनच जा...

**(महिपतराव जातात,)**

**रावसाहेब :** दिवाणजी,किती त्यागपत्रं...आपलं राजिनामे लिहून झाले?सह्या करुन देतो...

**दिवाणजी :** होतच आले...यादी वाचून दाखवू ?

**रावसाहेब :** नको...नको...काही गरज नाही त्याची...श्रीपती ...गेला का? मला बोलायचं आहे त्याच्याशी...

**दिवाणजी :** गेला..केव्हाच..न जेवताच...

**रावसाहेब :** त्यानं नेहमीप्रमाणे तुमच्याकडं पैसे मागीतले ?

**दिवाणजी :** नाही.....मी देऊ केले तरी घेतलेच नाही...असं पहिल्यांदाच घडलं !

**रावसाहेब :** ठीक आहे...कलंदर कलावंतच आहे.. तो...ताटपाणी झालं की बोलावणं पाठवा बाहेर... जाताना पुण्याहून आणलेली भीमसेन जोशींची रेकॉर्ड लावून द्या तेवढी...

**( दिवाणजी जातात. थोडया वेळानं रेकॉर्ड वाजू लागते........)**

अणूररणीया थोकडा....
तुका आकाशाएवढा
गिळुनि सांडिले कलिवर...
भवभ्रमाचा आकार
सांडिली त्रिपुटी....
दीप उजळला घटी
तुका म्हणे आता....उरलो उपकारापुरता

**पडदा.**

**(स्थळ तेच. उदास, गंभीर वातावरण. रावसाहेबांच्या वाढदिवसानंतर तीन महिन्यांचा. त्यांना सौम्य पक्षाघात होऊन गेला. इस्पीतळाचा आभास निर्माण करणारे नेपथ्य. धनाजी पाय चेपतो आहे. रावसाहेब एकाग्र होऊन पुढील अभंग ऐकत आहेत:)**

आनंदाचे डोही...आनंद तरंग
आनंदची अंग...आनंदाचे
काय सांगो जाले....काहीचिया बाही
पुढे चाली नाही...आवडीने
गर्भाचे आवडी...मातेचा डोहळा
तेथीचा जिव्हाळा...तेथे बिंबे
तुका म्हणे तैसा...ओतलासे ठसा
अनुभव सरिसा...मुखा आला

**रावसाहेब :** धना, पुरे आता! किती सेवा करशील आमची?

**धनाजी :** काई बी नाई चेपलं पाय.

**रावसाहेब :** पुरे!!पुरे!! बाईसाहेबांना बोलाव बघू...

**(धनाजी जातो. थोडया वेळानं संथपणे बाईसाहेब येतात.)**

**बाईसाहेब :** मला बोलावलंत?

**रावसाहेब :** हो...म्हटलं तिन्हीसांजा झाल्या. तेलवात लावली असंल .आता तुमच्याशी बोलत बसावं!

**बाईसाहेब :** आता कसं वाटतंय आपल्याला?

**रावसाहेब :** ठीकच म्हणायचं

ओले मातीचा भरवसा,का रे धरिसी मानसा...हेच खरं!!
तुकोबा म्हणतात
बहु या प्रपंचे भोगविल्या खाणी
टाकोनिया मनी ठेविला सीण.
हेही खरंच!! जगण्याचा शीण झालाय नुसता.तुम्हाला काय वाटतं?

**बाईसाहेब :** काय वाटायचंय त्यात?तुमच्या परीस वेगळं का आहे आहे आमचं जिणं?पण अशा तिन्हीसांजेला अशुभ काय ते मनात येतंय म्हणते मी?

**रावसाहेब :** अहो..आता जगाचा निरोप घ्यायचा तेव्हा शुभ काय अन अशुभ काय?मन देहाहून वेगळं का असतं? तुकोबा कसा ऐटीत गेला..द्या तो गाथा वाचून दाखवतो...

**(बाईसाहेब गाथा देतात. रावसाहेबांच्या वाचनशैलीत....)**

ऐका...ऐका..

भीत नाही आता..आपल्या मरणा

दुःखी होता जना...न देखवे

**बाईसाहेब :** पुरे करा म्हणते ना मी

**रावसाहेब :** किती सुंदर आहे ही अभंगवाणी

**(पानं उलटवीत पुन्हा वाचतात)**

नको नको मना..गुंतू मायाजाळी

काळ आला जवळी...ग्रासावया

**(पानं उलटवून..)**

आपुल्या माहेरा...जाईन मी आता

निरोप या..संताहाती आला

त्याची पंथे माझे...लागलेसे चित्त

वाट पाहे नित्य...माहेराची

**बाईसाहेब :** पुरे...पुरे हो....

**रावसाहेब :** इथला मुक्काम संपत आला..आता जुनं काही आठवायचं नाही...

**बाईसाहेब :** आठवायचं नाही कसं?तोच विरंगुळा आहे पुढच्या वाटचालीचा...

**रावसाहेब :** खरंच आहे तुमचं म्हणणं!! बद्रीकेदार आठवतं ना? तिथली बोचरी थंडी...आम्ही तुम्हाला कवेत घेतलं तो प्रसंग!!

**बाईसाहेब :** चला...चावट कुठले!! एवढं बरीक लक्षात राहिलं म्हणते मी!

**रावसाहेब :** तो गिरसप्पाचा धबधबा....राजस्थानचं वाळवंट....विसरला नाहीत ना सारं?

**बाईसाहेब :** कशी विसरेन बरं?वाडयावरच्या गाण्याच्या मैफिली....जलसे...नाचकाम...सगळं कसं लख्ख आठवतं आहे या घडीला....

**रावसाहेब :** आम्हाला आठवण झाली औषध घ्यायची....डॉक्टर यायची वेळ झाली ना...

**बाईसाहेब :** मीही मेली विसरभोळीच...देवाचा अंगारा लावायचा विसरलेच.संताजी गेलाय त्यांना आणायला.

**(वकील,दिवाणजी,अण्णासाहेब,तात्यासाहेब,नानासाहेब येतात.)**

**रावसाहेब :** या....या...मंडळी....तुमच्याशी बोलायचं आहे थोडं.**(बाईसाहेबांना)** तुम्ही आतनं अंगारा पाठवून द्या. धनाजीच्या हाती...आणि चहापोहे पण...

**(बाईसाहेब जातात.)**

**अण्णासाहेब :** तब्येत कशी आहे आता?

**रावसाहेब :** तिचं काय विचारता? क्षणात इहलोक....क्षणात परलोक....त्यात पुन्हा पक्षाघात म्हणजे पंखच छाटले ना आमचे!!

**तात्यासाहेब :** सौम्य पक्षाघात म्हणजे असाध्य आजार नसतो ....

**नानासाहेब :** हो ना...योग्य औषधोपचारानं आपण अगदी खडखडीत बरे व्हाल!

**रावसाहेब :** ते कोणी पाहिलंय? अजून वाणी शुद्ध आहे हीच भगवन्ताची कृपा...

**वकील :** आजच आम्हाला बोलवण्याची तातडी का एवढी?

**रावसाहेब :** हो...हो...अंधार पडायच्या आत आवराआवर करून पुढची जुळवाजुळव नको का करायला?

**वकील :** रावसाहेब, मृत्युपत्र सरकार दप्तरी नोंदलं गेलं, म्हणून आजच अगदी घाई करायला नकोय.

**रावसाहेब :** घाई नको कशी?सामानाची बांधाबांध करुन प्लॅटफॉर्मवर जाऊन उभं राहण्याची जुनी सवय आमची!

**अण्णासाहेब :** नका हो रावसाहेब असं निर्वाणीचं बोलू....

**रावसाहेब :** हा सगळा आमच्या गाथेचा नशा आहे.मनाची तयारी तिनंच करून घेतली आहे.ते असो!!

**(धनाजी चहापोहे घेऊन येतो.)**

घ्या,,,मंडळी...तुम्हा चौघाबरोबर आमचे दिवाणजीही विश्वस्त आहेत...त्यांना आणि वकिलसाहेबांना पूर्ण कल्पना दिलीय.आमचं मृत्युपत्र आमच्या मृत्यूनंतर न उघडता आमच्या मंडळीच्या मृत्यूनंतर उघडावं अशीच आमची इच्छा आहे.तोवर दिवाणजीच वाडयाचा कारभार सांभाळतील.समजलं?

**(संताजी डॉक्टरांची बॅग घेऊन येतो. त्या पाठोपाठ डॉक्टर येतात.)**

**डॉक्टर :** रावसाहेब तुम्हाला हजार वेळी सांगितलं....बैठक मारुन बसू नका..पडा बघू..का सुई टोचू?

**रावसाहेब :** हो...हो...पडतो आता!! हे वकील आणि डॉक्टर म्हणजे राहूकेतूच अगदी...

**अण्णासाहेब :** आम्ही निघतो आता. राम मंदिरात कीर्तन आहे नरहरीबुवांचं.तुम्ही येता?

**रावसाहेब :** आमचा नमस्कार सांगा बुवांना.सकाळी फराळालाच घेऊन या त्यांना. **(स्वताशी)** हं...मोरा तुझे थकले पाय....आता उडून उपयोग काय?

**(सगळेजण गंभीरपणे निघून जातात, डॉक्टर तपासतात. दिवाणजी मदत करतात.)**

**डॉक्टर :** रावसाहेब, अतिश्रम होताहेत.फार फार काळजी घ्यायला पाहिजे आपल्याला.

**रावसाहेब :** सुई टोचा ना डॉक्टर नेहमीची...मग गुमान पडून राहू आम्ही..अळी...मिळी..गुप चिळी...अळी...मिळी..गुप चिळी....अ...ळी...मि..ळी....

**(डॉक्टरांची इंजेक्शन देण्याची कृती हळुहळू स्थिर होते. दिवाणजी हंबरडा फोडतात. बाई साहेबांसह सगळेजण वेगवेगळया दिशांनी धावत येतात. प्रत्येक पात्र स्थिरावत जाताना रावसाहेबांचा आवाज ऐकू येतो. प्रकाश हळुहळू मंदावत जातो.)**

कोण होतास तू? कलाप्रिय रसिक की मुमूक्षू साधक? उदार...दिलदार.तालेवार...की दिलवर? काहीच कसं ठरवता येत नाही? तुला स्वताविषयी? खरं तर कोणत्याही पिंडाविषयी नेमकं सांगणंच किती कठीण असतं!! कसं जगलास तू? पिंडाला कावळा शिवेल तुझ्या? दत्तक नाकारलास आणि औरसपुत्र नसल्याचं दुःख सुखासारखं कुरवाळलंस...मिरवलंस..तुझं ते जगावेगळं मृत्युपत्र!!! काय होईल त्याचं?श्रीपतीनं दिलेलं तैलचित्र अगदी यथार्थ वाटलं का तुला? का लपवलंस ते जगापासनं? जगाला घाबरुन की स्वताला घाबरुन? काय असंल याचं उत्तर ?

नटनाटये अवघे...संपादिले सोंग भेद दाऊ रंग... न पालटे
मांडियला खेळ....कौतुक बहुरुप आपुले स्वरुप ...जाणतसो
स्फटिकाची शिळा ...आधी न मिळे भाव दावी ... पिवळे लालसंगे
तुका म्हणे आम्ही...या जनाविरहित....होऊनि निश्चिंत... क्रीडा करु

**प ड दा . अं क दु स रा स मा प्त.**

# अंक तिसरा

प्रवेश पहिला

**(स्थळ तेच.उदासवाणे वातावरण. त्यावर मात करण्यासाठी भूपाळीचे सूर. धवल वेषातल्या बाईसाहेब गाथा वाचत आहेत.)**

**बाईसाहेब : (वाचन शैलीत)**

चाले हे शरीर . ...कोणाचिया सत्ते
कोण बोलविते...हरीविण
देखवी ऐक्वी...एक नारायण
तयाचे भजन....चुको नये
माणसाची देव...चालवी अहंता
मीची एक कर्ता. .म्हणोनिया
वृक्षाचेही पान...हाले त्याची सत्ता
राहिली अहंता...मग कोठे
तुका म्हणे विठो...भरला सबाही
तया उणे काही...चराचरी

**(दिवाणजी येतात.)**

**दिवाणजी :** येताना भाजी चांगली दिसली ती घेऊन आलो.दुधवाला येऊन गेला?

**बाईसाहेब :** हंऽऽ

**दिवाणजी :** महिपतरावांचं पत्र आलंय...काय उत्तर लिहायचं त्याला?

**बाईसाहेब :** काय वाटतं तुम्हाला?

**दिवाणजी :** मला तर उत्तरच लिहावसं वाटत नाही! सगळाच पोकळ दंभ..खोटा विनय...पाठीमागं आपली निंदा नालस्ती...

**बाईसाहेब** : ठीकआहे धाडू नका उत्तर..तो आला म्हणजे आम्ही बोलू त्याच्याशी सविस्तर.

**दिवाणजी :** डॉक्टरसाहेबांचं बील चुक्तं करायचं ना या महिन्यात?

**बाईसाहेब :** त्यात विचारायचं काय?देऊन टाका. आणि हो,येत्या एकादशीला विठ्ठल मंदिरात नामसप्ताह आहे ना,त्यासाठी शंभराची देणगी पाठवायची आठवण ठेवा...

**दिवाणजी :** बरं! आळंदीच्या अनाथ आश्रमालाही पाचशेची देणगी कबूल केली होती.ती मनिऑर्डर धाडायची ना?

**बाईसाहेब :** पाठवा आजच..बरं, तुमच्या धाकट्याची प्रकृती कशी आहे? त्याला आपल्याच डॉक्टरांकडं घेऊन जा. पैशांची काळजी नको.....

**दिवाणजी :** त्याला बरं वाटतंय पण आता मधली तापली कालपासनं..

**बाईसाहेब :** म्हणजे सध्या घरात एकाचं ना एकाचं दुखणं चालूच आहे.आम्ही स्वताच येऊन जाऊ दुपारी...

**दिवाणजी :** यालाच प्रपंच म्हणतात ना...

**बाईसाहेब :** दिवाणजी,माडीवर त्या श्रीपतीची बरीच चित्रं पडली आहेत ना? ती धनाजीकडनं भिंतीवरनं काढून कपाटात रचून ठेवा.

**दिवाणजी :** तशीच असू द्यावीत भिंतींवर असं मला वाटतं..रावसाहेबांची आवड होती ती.

**बाईसाहेब :** जळली मेली आवड..बरं, सगळीच चित्रं सारखी नाहीत.देवादिकांची चांगली वाटतात पण ते भिल्लीणीचं चित्र.....मीनाकुमारीचं चित्र म्हणजे कहर आहे नुस्ता. जाळायला हवी चुलीत. श्रीपती इथं आला की आश्रित म्हणून वावरतो आणि गावभर क्लंदर म्हणून डवरतो. हे त्याला खर्चाला मुबलक पैसे द्यायचे. मग त्याचं काय खरचतं फाजील चित्रं काढायला अन यांना आणून द्यायला?

**दिवाणजी :** तुमच्या विचारांमधे तथ्यांश जरूर आहे.म्हणूनच तुम्ही रावसाहेब गेल्यापासनं माडीवर गेल्याच नाहीत.

**बाईसाहेब :** असंच नाही काही....पण मनच उदास झालंय आमचं.त्यात जिना चढाउतरायला डॉक्टरांनी मनाई केली नाही का?

**दिवाणजी :** डॉक्टर नाही ना आले अजून?

**बाईसाहेब :** येतील अंमळशानं.....

**(धनाजी टपाल देऊन जातो.)**

**बाईसाहेब :** कुणाची येवढी पत्रं?

**दिवाणजी :** नेहमीचीच दिसताहेत...देणगीसाठी विनवणी करणारी नाही तर दुखवटा,सदेश लिहिलेली...हांऽ हे एक पत्र वेगळंच दिसतंय...त्यांना रावसाहेबांनी देणगी दिली होती आता त्यांना रावसाहेबांचे फोटो हवेत आहेत...तैलचित्र काढून घेण्यासाठी...काय करायचं?

**बाईसाहेब** : तैलचित्र आहेच कुठं इथं!! त्यांना कळवा...या आणि घेऊन जा फोटो हवे तितके. तैलचित्र काढायला...

**दिवाणजी :** श्रीपतीला सांगितलं पाहिजे...

**बाईसाहेब :** त्यानं ढीगभर चित्रं काढली...पण यांचं काही काढलं नाही...यांनाही कधी सुचलं नाही.

**दिवाणजी :** असंच असंच असतं...

मृगाचिये अंगी कस्तुरीचा वास,<br>
असे ज्याचा त्यास, नसे ठावा.

**(संताजी पाठोपाठ डॉक्टर येतात. संताजी जातो.)**

**डॉक्टर :** काय चाललंय?

**दिवाणजी :** काय चालायचंय? नेहमीचंच.....

**डॉक्टर :** बाईसाहेबांची तब्येत काय म्हणतेय?

**बाईसाहेब :** आता बरीच म्हणायची!!

**डॉक्टर :** मी दिलेल्या गोळया चालू ठेवायच्या..

**बाईसाहेब :** अखेरपर्यंत हे असंच चालणार का डॉक्टर?

**डॉक्टर :** छे..कोणी सांगितलं आपल्याला?आठेक दिवसात खडखडीत बऱ्या व्हाल!! हां ऽ मात्र आता एक मात्र खरं रक्तदाब तुमचा सोयरा सांगाती..

**बाईसाहेब :** डॉक्टरसाहेब,चहा घेऊन जा..आत्ता पाठवते...

**(रक्तदाब तपासल्यावर त्या आत जातात.)**

**डॉक्टर :** हंऽ काय..दिवाणजी? काय म्हणते वाडयाची हालहवाल?

**दिवाणजी : (नाटकीपणाने)** म हा रा ज ,नगराची हालहवाल आलबेल आहे....रावसाहेबांनी योगक्षेमाची भक्कम तरतूद केली आहे.......बाईसाहेब मुठी भरभरुन दानधर्म करताहेत... वकीलसाहेबांनी जमिनीचे व्यवहार अक्कलहुशारीनं निस्तरले आहेत..त्यामुळे रामरगाडयाला आटोपशीरपणा आलाय...

**डॉक्टर :** महिपतराव काय म्हणताहेत?

**दिवाणजी :** त्यांची येतात अधनं मधनं पत्रं...चिठ्ठयाचपाटया..एखाद दुसरी चक्कर...

**डॉक्टर :** काय हो? महिपतरावाविषयी रावसाहेबांना आपलेपणा कधीच वाटला नाही.बाईसाहेबही त्याच्याविषयी कधीच बोलत नाहीत.

**दिवाणजी :** तसं निश्चित नाही सांगता येणार? अढी आहे हे मात्र खरंच...कदाचित त्यांचं वळण बिघडल्यामुळं असंल...

**डॉक्टर :** पण गावात वेगळीच चर्चा चालू आहे...रावसाहेबांच्या वळणाविषयी काहीबाही कुजबुजताहेत लोक. ती श्रीपतीची बायको कुठं असते हो?...असं काहीच्या काही सांगत असतो महिपतराव .....गावभर....

**दिवाणजी :** छे! छे! भलतंच काहीतरी,,,,तसं काहीच नाही...रावसाहेबांचं चारित्र्य म्हणजे खाणीतला अभंग हिरा!! त्याला भंगण्याची अजिबात भीती नाही.

**(धनाजीनं आणलेला चहा घेऊन डॉक्टर निघतात. त्यांच्यासह संताजी जातो.)**

**दिवाणजी :** चला...धनाजीराव,आजची कामं लक्षात ठेवा... मनिऑर्डरी करणं,बीलं चुक्ती करणं,पत्रं लिहिणं,धाक्टीला शिशुशाळेतनं आणणं.

**धनाजी :** ही धाक्टी कोन जी?

**दिवाणजी :** अरे आमचं तीन क्रमांकाचं अपत्य!! कन्यारत्न..

**धनाजी :** हा ंऽ म्हनजे आपत्यी....आपत्यी....

**संताजी :** **(आत येत)** कोन्हावर आली आपत्यी?

**दिवाणजी :** माझ्यावर!! माझीच आपत्ती नाही अपत्यी. तू इतक्या लवकर कसा आलास?

**संताजी :** अवं त्ये महिपतराव आलेलं दिसत्येत...म्हून आलो खबर देयाला...

**दिवाणजी :** बरं..बरं....

**(महिपतराव येतात.)**

**महिपतराव :** नमस्कार...दिवाणजी,,,काय म्हणते मामीसाहेबांची तब्येत? कुठं आहेत त्या?

**दिवाणजी :** धनाजी बोलावून आण त्यांना...

**(धनाजी बाईसाहेबांचा हात धरुन घेऊन येतो.महिपतराव नक्ली चरणस्पर्श करतात.)**

**बाईसाहेब :** आशीर्वाद ...फारा दिवसांनी सय आली मामीची....

**महिपतराव :** तशी आठवण येतच असते आम्हाला...काय करणार आमचं राजकारण वाढत चाललंय...त्यामुळे फुरसतच मिळत नाही...माझं पत्र मिळालं असंलच...

**दिवाणजीः** हो..मिळालं ना..

**महिपतराव :** त्याच्या उत्तराची वाट पाहात होतो...म्हटलं चार दिवस तुम्ही माझ्या गावी यावं..तेवढीच सेवा करता येईल...

**बाईसाहेब :** सेवेची गरज नाही आम्हाला...

**महिपतराव :** का? रागावलात?

**बाईसाहेब :** नाही... आनंद झाला आम्हाला...तुम्ही कसं वागतात..आमच्याविषयी काय काय बोलतात ते येतंच ना आमच्या कानांवर..

**महिपतराव :** मामीसाहेब,यालाच कान फुंकणं म्हणतात...आमचा दिल साफ आहे..गाथेची शपथ.

**दिवाणजी :** हांऽ गाथेला विटाळण्याचं कारण नाही....

**महिपतराव :** ते असू द्या...मामीसाहेब,पत्रात लिहिलं ते समक्ष बोलायचंय...

**बाईसाहेब :** कशाबद्दल?

**महिपतराव :** ती नदीपलीकडची जमीन मामासाहेबांनी गहाण ठेवली..तिचा कब्जेदार आला होता माझ्याकडे.म्हणत होता..

**दिवाणजी :** याबाबत वकीलसाहेबांशी बोलणं झालंय...

**महिपतरावः** झालंय ना? हेच हवं होतं मला...लोक काय वाट्टंल ते बरळतात...तुम्ही असं करा दिवाणजी,जमिनींची सगळी कागदपत्रं घेऊन माझ्याकडं या. आपण तपासून बघू.....

**बाईसाहेब :** दिवाणजी येणार नाहीत..हे मी आत्ताच निक्षून सांगते...महिपतराव,तुम्हाला माझं एकच सांगणं आहे...तुम्ही आमच्या व्यवहारात अजिबात पडू नका! भाचे म्हणून हवं तेव्हा

वाडयावर या...खा...प्या...पण....

**महिपतराव :** आम्हाला घरी खायला प्यायला मिळत नाही का मामीसाहेब ?तुमचं नुसतं खायचं प्यायचं कशाला?तुम्ही आमच्यावर काहीतरी जबाबदारी टाकायला हवी.तरच...

**बाईसाहेब :** ते जमणार नाही...यांनी जे मृत्युपत्र केलंय ते वकीलसाहेबांशिवाय कोणालाही ठावकी नाही....त्यामुळं...

**महिपतराव :** ठीक आहे..तुमची इच्छा!! पण एक लक्षात असू द्या...मी तुमचा एकुलता एक भाचा आहे.निदान दशक्रिया विधीचा हक्कदार.....

**दिवाणजी :** काय बोलताहात तुम्ही.....समजतं का तुम्हाला तरी...

**(महिपतराव रागारागाने ताडताड निघून जातात.)**

**दिवाणजी :** त्यांचं बोलणं मनाला लावून घेऊ नये..अहो, गर्जेल तो वर्षेल काय? रडत बसू नका आपण!! गाथा देतो ती वाचत बसा. मी धनाजीला घेऊन जरा बाहेर जाऊन येतो...संताजीला शेतावर पाठवलंय....एकटयाच आहात आपण...

**बााईसाहेब : (वाचनशैलीत)**

कौतुकाची सृष्टी.....कौतुकेची केले कष्टी

मोडे तरी भले खेळ......फाके फाकील्या कोल्ल्हाळ

जाणणियासाठी...... भय सामावले पोटी

तुका म्हणे चेता.... होणे ते तूच आइता...

**(हलक्या पावलांनी श्रीपती दबकत दबकत येतो.बाईसाहेबांकडे टक लावून पाहतो. त्याच्या हातात गुंडाळलेले तैलचित्र.)**

**बाईसाहेब :** कुठं होतास इतके दिवस?

**श्रीपती :** ..........

**बाईसाहेब :** कधीचाच वाडयावर फिरकलाच नाहीस...

**श्रीपती :** इथंच होतो...

**बाईसाहेब :** काय चाललाय तुझा उद्योग?

**श्रीपती :** काही..नाही...चित्रं काढतो.....

**बाईसाहेब :** कुणाची?

**श्रीपती :** कुणाचीही..झाडामाडांची..फुलाफळांची...ढगानगांची...पाण्यापावसाची..मैना राघूची....

**बाईसाहेब :** राहतोस कुठं गावात?

**श्रीपती :** सारखा हिंडत असतो...चित्रांच्या शोधात...विचित्रांच्या प्रदेशात...रहायला एक खोली

आहे.रावसाहेबांनी मिळवून दिलेली...खानावळीची व्यवस्था त्यांनीच केलेली. तुम्ही याल माझी खोली पहायला?

**बाईसाहेब :** मी?आता कसलं जमायला?

**श्रीपती :** याच एकदा..मी पांढऱ्याशुभ्र बैलांची घुंगराची गाडी पाठवीन.पिवळीधमक घुंगरं तालासुरात वाजू लागतील.गाडीला असेल रेशमाचं छप्पर.मोर रेखाटलेली कापडी दारं.त्यांना लावलेले ऐने...

**बाईसाहेब : (हसत. कौतुकाने)** आणि तिच्यात बसलेली मी!! म्हातारी गुलाबाई!!काय रे मी तुझ्या घरी आल्यावर काय करशील?

**श्रीपतीः** माझ्या मठीत शिरताना खाली वाकायचं.नाही तर कपाळाला टेंगूळ येईल. मग चपला काढायच्या कोपऱ्यात.मी धूळ झटकून देईन निघताना.खुर्चीत अलगद बसायचं.दोन पाय मोडले आहेत ना तिचे.बिच्चारी! मी विचारीन,काय घेणार? तुम्ही सांगायच,काहीच नको!! मला किती हायसं वाटेल!!

**मी म्हणेनं चित्रं पहा.....तुम्ही म्हणा विचित्र हा**

**डोंगर नद्या फुलवेली.....पहा कशी मी रंगवली**

**ऊनपाऊस सांजसावल्या....पहा कशा मी रंगवल्या**

**भाव कठोर ,संतप्त कोवळे....पहा कसे मी रंगवले**

**तुफान वादळ भरती गलबत....पहा रंगांची शिंपण अलबत**

**तारा वारा वाटा लाटा... अंगांगावरचा शहारकाटा**

**बागबगिचा फुगडी गवळण...पहा माझ्या रंगांची उधळण!!**

**चित्रं पाहता पाहता तुम्ही म्हणायचं...पुरे ...पुरे**

**बाईसाहेब : (हसत)** पुरे!!

**श्रीपती :** आता नाही...तेव्हा....मग मी तुम्हाला गोष्टी सांगीन...लैला मजनुच्या,हीर रांजाच्या....

**बाईसाहेब :** हे काय नवीन आणखीन? कोणते देवादिक आहेत ते? आणि हे काय आणलं आहेस बरोबर?

**श्रीपती :** हे आहे तैलचित्र! तुमचं तैलचित्र !!मी काढलेलं!! दाखवू ?

**बाईसाहेब :** दाखव बाबा दाखव,,,होऊ दे एकदाची तुझी हौस!!

**(श्रीपती प्रेक्षकांना दिसेल असं तैलचित्र मांडतो. त्यात रेखाटलेल्या बाईसाहेब सौभाग्यालंकारयुक्त, देखण्या, शृंगारिक ढंगाच्या.)**

**बाईसाहेब : (संतापाने थरथरत.उभ्या राहात)** चांडाळा...केव्हा काढलंस हे चित्र?

**श्रीपतीः (तैलचित्र गुंडाळून काखेत मारत )** काल.... उत्तर रात्री!!

**बाईसाहेब :** शरम नाही वाटली काढायला?काही मानमर्यादा आहेत की नाही? खाल्ल्या घरचे वासे मोजणारा मेला...पापी...दुराचारी...लफंगा..आत्ताच्या आत्ता तोंड काळं कर तुझं...ते..ते.. अभद्रही घेऊन जा..चुलीत टाकून ते....पुन्हा कधी वाडयावर यायचं नाही..समजलं? चल..निघ इथून...

**(श्रीपती जड पावलांनी तैलचित्रासह निघून जातो.)**

**पडदा**

## प्रवेश दुसरा

**(हा प्रवेश पहिल्या अंकाच्या शेवटाशी जोडलेला आहे. त्या वेळचंच नेपथ्य आणि पात्रांच्या अवस्थेत सुरु होतो...... पडदा वर जातो तेव्हा एका कोपऱ्यात रचून ठेवलेल्या वस्तू दिसत आहेत. उदाहरणार्थ :रिकामा देव्हारा, पितळी समया, तस्बीरी, फुलदाण्या इत्यादी.)**

**वकील :** धनाजी,संताजी पुन्हा एकदा जा माडीवर आणि शोधा याचं तैलचित्र ...दिवाणजी ,तुम्हीही जा त्यांच्याबरोबर अगदी माळे.पोटमाळेही धुंडाळा....समजलं?

**अण्णासाहेब :** खरोखरच आश्चर्याचीच गोष्ट आहे...रावसाहेब,गबाळे...अजागळ मुळीच नव्हते. त्यात चित्रं म्हणजे त्यांना जीव की प्राण वाटत...

**नानासाहेब :** आता वकीलसाहेबांनी कडक सूचना दिल्या आहेत ना? मग सांपडंलच ते.जाईल कुठं ?नाहीतर स्वता वकीलसाहेबसुद्धा काळा कोट उतरवून शोधाला निघतील.तसाच जिद्दीचा माणूस जोडला आहे...रावसाहेबांनी....

**वकील :** तुम्ही नाही का जिद्दीचे? तुम्हालाही घेऊन जाईन मी वरच्या अंधाऱ्या माळयावर ...श्रीपती, तू बस बघू शांतपणे एका जागी...तैलचित्र सांपडल्याबरोबर तुला परत केलं जाईल.

**(एक माणूस चिठ्ठी घेऊन येतो. वकीलसाहेबांना देतो.ती वाचून...)**

**वकील :** हे पहा..मी जरा बँकेत जाऊन येतो...ऑडिट चाललंय तिचं..काहीतरी अफरातफर झाली... ती पाहून येतो..खरंखोटं...

**(वकीलसाहेब लगबगीनं जातात.)**

**तात्यासाहेब :** पण वकीलसाहेबांचा बँकेशी काय संबंध?

**नानासाहेब :** तेच सध्या चेअरमन आहेत बँकेचे! काही सांपडलं असेल ऑडिट पार्टीला काळंबेरं.

**अण्णासाहेब :** बाकी वकीलसाहेब काही खाबूगिरी करणारे नाहीत...एखाद्या कर्माचाऱ्यानं केलं असंल कृष्णकृत्य...पण शेकणार मात्र यांच्यावर...

**तात्यासाहेब :** असल्या प्रकरणांमध्ये चेन असते वरपासनं खालपर्यन्त...चेनमध्ये राहूनच चैन करता येते आजकाल!

**नानासाहेब :** त्यात पुन्हा अंतरी नाना कळा असलेल्यांचा वेश अगदीच बावळा असतो.

**(महिपतराव हातात सूटकेस घेऊन येतात.)**

**तात्यासाहेब :** हे काय? आपण कुठं निघालात?

**महिपतराव :** मुम्बईला...बॅरिस्टर शोधायचा आहे ना लवकरात..लवकर....वकीलसाहेब कुठं गेले?

**नानासाहेब :** त्यांच्याभवती पडला शनीचा फेरा...बँकेत अफरातफर झाल्याचा निरोप आला . आपल्याला

काही सांगायचं होतं का त्यांना?

**महिपतराव :** आता सांगून काय उपयोग? भेटले असते तर बरं झालं असतं.. इथल्या इथंच मिटवता आलं असतं! सहकारखात्यात वरपर्यन्त ओळखी आहेत आमच्या...

**अण्णासाहेब :** मग तुम्ही मिटवाच...मी सांगेन निरोप वकीलसाहेबांना....

**महिपतराव :** इतकं साधं असतं का सगळं? धाग्यादोऱ्यात गाठी असल्या की गुंता वाढतच जातो...अरे हा तर...श्रीपती...ओळखलंच नाही त्याला...हं...काय, श्रीपतीराव?

**श्रीपती :** .........

**तात्यासाहेब :** भ्रमिष्टातच जमा झालाय तो! तैलचित्राचा हटट् धरुन बसला आहे!! त्यामुळे आजच्या सभेचं कामकाज खोळंबलंय...

**महिपतराव :** तैलचित्र म्हणजे काय हो ? गोडया तेलानं कढवलेलं असतं का ते?

**नानासाहेब :** नाही हो तेलकट ,महागडया रंगात चितारलेलं असतं ते.

**महिपतराव :** माडीवर ढीगभर पडली आहेत धूळ खात ती सगळीच्या सगळी देऊन टाका त्याला. म्हणजे झालं! पैशाला पासरी आणि फुकटची बासरी..

**अण्णासाहेब :** ती नको आहेत त्याला...रावसाहेबांचं त्यानं काढलेलं तैलचित्र हवं आहे त्याला... बाकी काहीच नको म्हणतो तो...

**महिपतराव :** 'बाकी काही नको...'म्हणतो तो? याचा विचार करावा लागेल शांतपणे..ठीक...बरं का श्रीपतीराव,सांपडंल हं तुमचं चित्र...अवश्य सांपडंल,,,वाडयावरचा सुईदोरासुद्धा शाबूत आहे आमच्या मामासाहेब आणि मामीसाहेबांचा...निघतो मी..

**(नानासाहेबांच्या कानात कुजबुजत )** याची रक्कम आपण वाटून घेऊ आपसात . कशी वाटते योजना ?

**(महिपतरावांसह खलबत करत सगळे जातात. एकटाच श्रीपती उरतो. )**

**श्रीपती :** हूं ऽऽऽ पक्षी दिगंतरा गेले....मावळतीचे रंग ओघळले
मोरमोरनीचे पिसारे झडले...कावळे बाजार मांडून बसले
रंगाचे पूर ओसरले.....चित्रकुटीतले वसन्त सरले
उसन्त घेण्याआधी भैरवीचे सूर उमटले .......
काय चितारले मी...कसे चितारले मी .......कुणास ठावे
सांजभैरवी गाता गाता...धरतीच्या कुशीत शिरता
नको कशाची मजला बाधा...
म्हणेन.. मी अन माझी राधा...माझी राधा....

शुभ्र केतकी तकतकलेली ...उन्नत पिवळी मुसमुसलेली
वादळात ती झपाटलेली...पाऊसपाण्यात भिजलेली
नागाकडून वेढलेली....हत्तीकडून तुडवलेली
सांजभैरवी गाता गाता,,,धरतीच्या कुशीत शिरता
म्हणेन मी गाणे आता
ये ग ये ग गुलाबाई
माझी चित्रकला पाही
तुझ्या अस्तित्वाची प्रीती
नादावला श्रीपती..नादावला श्रीपती....

**(बाहेरून अण्णासाहेब, तात्यासाहेब, नानासाहेब येतात.)**

**तात्यासाहेब :** मला वाटतं, नानासाहेब,आजच्या सभेत आपण दैनिक भत्त्याची तरतूद करून घ्यावी. धर्मार्थ मोफत काम करण्याचे दिवस आता गेले...

**नानासाहेब :** कल्पना चांगलीच आहे...अशा सभा वारंवार होणार...आपल्याला त्यांना हजर राहून वेळ द्यावा लागणार...प्रत्येक सभेचे किमान शंभर तरी घ्यावे...

**अण्णासाहेब :** काय गरज आहे हो याची?रावसाहेबांनी आपल्यावर विश्वास टाकला तो काय यासाठी?नाही तरी एरवी आपण काय करतो? हरीऽऽहरी नाही तर उडवतो याची त्याची भंबेरी!!

**तात्यासाहेब :** ते काही असलं तरी मी तसं सुचवतो दिवाणजींना....

**(घामेघूम झालेले दिवाणजी येतात.)**

**अण्णासाहेब :** सांपडलं तैलचित्र?

**दिवाणजी** : सांपडलं एकदाचं!!

**श्रीपती :** सांपडलं? कुठं आहे ते?

**दिवाणजी : (चिडून)** हं...आता थोडा धीर धरा...टिकोजीराव !!आणताहेत.धनाजी,संताजी..त्याच्यावरची धूळ झटकून..

**तात्यासाहेब :** तुम्हाला येवढं चिडायला काय झालं?

**दिवाणजी :** कळंलच सर्वांना....थोडया वेळात...खाल्ल्या घरचे वासे मोजणारीच ही औलाद आहे....फार लाडकोड पुरवले या टिकोजीरावाचे...

**अण्णासाहेब :** काय झालं? झालं काय?

**दिवाणजी :** म्हणे...रावसाहेबाना माणसांची फार पारख होती! ती असती तर हे असे अस्तनीचे निखारे

बाळगले नसते जवळ...स्वताचं नाक कापलं तरी पंचवीस हजाराचा हक्कदार केला रावसाहेबांनी याला...यालाच म्हणतात प्राक्तन!

**नानासाहेब :** म्हणजे रावसाहेबांच्या तैलचित्रात काऽही वेडंबिद्रं आहे का? सवयच आहे त्याची.

**दिवाणजी** : बघालच आता स्वताच्या डोळयांनी!! याचं असं तर तिकडे महिपतरावांचं तसं! कसं तिरपागडं आहे सगळं!! वकीलसाहेब कुठं आहेत?

**तात्यासाहेब :** महत्त्वाच्या कामासाठी बाहेर गेले आहेत.येतीलच इतक्यात...

**दिवाणजी :** म्हणजे सभेचं कामकाजही बोंबललं ना आता?

**(धनाजी आणि संताजी तैलचित्र घेऊन येतात. ते प्रेक्षकांना दिसेल असे मांडतात. बटबटीत नाक, खोल डोळे. खप्पड गाल, काळपट वर्ण अशा व्यंगचित्र शैलीतलं हे तैलचित्र आहे. सगळेजण ते विमनस्क होऊन पाहतात.)**

**अण्णासाहेब :** भले शाब्बास!!!म्हणजे आमच्या रावसाहेबांची चांगलीच पाद्यपूजाऽच केली यानं!!

**नानासाहेब :** म्हणूनच त्यांनी येवढं सात कोपऱ्यात लपवून ठेवलं असावं!!

**तात्यासाहेब :** तरीही पंचवीस हजारांचा खुर्दा केला त्याच्यासाठी...

**नानासाहेब :** हाकलून दिलं पाहिजे...साऽऽऽला...

**अण्णासाहेब :** म्हणतात ना वाघ्याचा झाला पाग्या...मूळ स्वभाव जाईना...

**दिवाणजी :** रावसाहेबांचा तरी मूळ स्वभाव कुठं गेला?

**अण्णासाहेब :** सुंभ जळाला तरी पीळ काऽयमच राहिला...

**नानासाहेब :** असं करण्यामागे रावसाहेबांचा काऽही तरी हेतू असला पाहिजे...

**अण्णासाहेब :** कसला हेतू? अप्रतिष्ठा टाळण्यासाठी त्यांनी याला पैसे दिले असतील आणि चित्र नष्ट न करता लपवून टाकलं. येवढी साधी गोष्ट आहे ही. ते संग्राहक होते!

**तात्यासाहेब :** म्हणजे शुद्ध ब्लॅकमेलींग केलं यानं...

**दिवाणजी :** हे वकीलसाहेब कसे आले नाहीत अजून?

**श्रीपती :** देताय...माझं.... तैलचित्र.... परत.....? मला आता घाई झाली आहे मठीत घेऊन जाण्याची...मग अनंताच्या प्रवासाला निघण्याची....

**नानासाहेब :** मला वाटतं...देऊन टाकावं....फकीरच आहे तो...तसाच मेलाबिला तर आपल्याच मागं लागायचा...त्याचा आत्मा!!

**अण्णासाहेब :** अहोऽ असंच देऊन कसं चालेल?गावात समजलं तर नाचक्की होईल ना आपली!

**दिवाणजीः** ते काही त्याला जमणार नाही. शिवाय त्याचे पंचवीस हजार आहेत ना आपल्याच हातात! उलट तैलचित्र दिलं नाही तर बरळत फिरंल गावभर! सगळयांच्या नावानं!

**अण्णासाहेब :** ठीक आहे देऊन टाकू..हं..श्रीपती उचल तुझं चित्र आणि चालू लाग.सरळ वाटेनं तुझ्या मठीत जा…कोणालाही कधीच दाखवायचं नाही ते..समजलं?

**श्रीपती :** समजलं!….चलतो आम्ही…

नाच रे मोरा..आंब्याच्या बनात…

काळा काळा कापूस फुलला रे…

चल ग राणी रानात..

चाफ्याचं फूल तुझ्या वेणीत…

**(श्रीपती अतिशय वेगानं निघून जातो. थोडया वेळानं वकीलसाहेब येतात.)**

**वकील :** सांपडलं ना तैलचित्र?

**दिवाणजी :** सांपडलं आणि परत दिलंसुद्धा…

**वकील :** अहो... काय केलंत हे...तो श्रीपती वाडयाबाहेर दोन चित्रं टांगून बसलाय.. एक रावसाहेबाचं अन् दुसरं बाईसाहेबाचं....वेडयासारखा बरळतोय ... धनाजी... संताजी जा त्याला आत घेऊन या.....

**( दोघेजण जातात अन धनाजी श्रीपतीची दोन तैलचित्रं घेऊन येतो.. ती प्रेक्षकांना न दिसतील अशी ठेवली जातात.)**

**अण्णासाहेब :** वकीलसाहेब,तुमचं काय झालं ते सांगा आधी!!

**वकील :** काय होणार?फार मोठी अफरातफर आहे…आता संबंधितांवर पोलीस कारवाई!!

**दिवाणजी :** तुम्हाला काही धोका नाही ना?

**वकील :** आजच काहीही सांगता येणार…तशा सह्या अडकल्या आहेत माझ्या… अरे, धनाजी तू फक्त चित्रंच आणलीस ... तो हरामखोर श्रीपती कुठाय ?

**धनाजी:** अवो... तो निसटला माज्या हातनं....कशीबशी ही दोन काढून घ्येतली त्याच्याकडनं...

**दिवाणजी :** एकाची दोन कशी झाली? काढ बघू दोन्ही अन् ठेव या कोचावर...

**( धनाजी ती प्रेक्षकांना दिसतील अशी ठेवतो. रावसाहेबांचं बेढब अन् बाईसाहेबांचं देखणं असं तैलचित्र पाहून सगळेच अवाक् होतात. )**

**अण्णासाहेब :** खाल्ल्या घरचे वासे मोजणारा निघाला हा श्रीपती... रावसाहेबांचं असं वेडं विद्रूप बटबटीत चित्र काढण्याचं त्याला सुचलंच कसं म्हणतो मी....

**दिवाणजी** : आणि रावसाहेबांनी त्या सापाला तहहयात दूधच पाजलं हो....एवढी गरळ ओकला तरी...

**नानासाहेब** : या बाईसाहेब पाह्यल्या का? कशा साध्वी, सोज्वल दिसताहेत त्या.. बघत राहाव्याशा वाटतात... देखण्याच होत्या बाईसाहेब...मला वाटतं...आजची सभा तहकूब करावी आता....डोक्याला चांगलाच शीण दिलाय त्या चित्रकारानं....

**वकील** : छे...छे... असं कसं चालंल? सभेसाठी मी एवढा धावत पळत आलो...तेव्हा वाचन मंदिराच्या उभारणीच्या दृष्टीनं आता आपल्याला पावलं उचलयला हवी....बाकी रावसाहेब खरे रसिकच होते... येवढं बेढब चित्र त्यांनी स्वीकारलं अन् लोकांनी नावं ठेवू नये म्हणून लपवून टाकलं सांदी कोपऱ्यात....

**दिवाणजी** : रावसाहेब गेल्यावरही तो श्रीपती येऊन बसायचा वाडयावर आणि बोलत बसायचा तासन् तास... ती माऊलीसुद्धा त्याला मदत करायची हवी तेवढी...पण हे चित्र त्यानं त्यांना केव्हा दिलं हे मलासुद्धा कधीच कळलं नाही....नक्कीच.. नक्कीच.. त्या माऊलीला त्यानं हे चित्र दिलंच असणार... आणि तिनं ते न घेता त्याच्याच अंगावर फेकून दिलंच असणार...

**वकील** : शक्य आहे... अगदीच शक्य आहे ... केवढया यातना झाल्या असतील ! दोघंही पुण्यात्मे होते... पराकोटीचे. एक जातीवंत रसिक तर दुसरा श्रद्धावंत धार्मिक....

**(अंधार होत जातो....पुन्हा प्रकाश वाढत जातो तेव्हा महिपतराव श्रीपतीची मानगूट धरून प्रवेश करतात. त्यांच्या हातात तिसरं तैलचित्र..)**

**महिपतराव** : हे... हे .. चित्र काखोटीत मारून बरळत चालली होती याची स्वारी.. आम्हाला वाटलं मामासाहेबाचंच चित्र असंल त्याच्याकडे.. म्हणून त्याला जबरदस्तीनं बसवलं गाडीत अन् आनला वाडयावर ...

**( वकीलसाहेब तिसरं तैलचित्र प्रेक्षकांना दिसेल असं कोचवर ठेवतात. ते श्रीपतीचं स्वतःचं अत्यंत देखणं, रुबाबदार असं हे तैलचित्र आहे. त्याच्यावरच प्रकाशवर्तुळ स्थिरावत जाते. )**

**वकील** : ओ ... माय गॉड.....

**प ड दा . अं क ति स रा स मा प्त**

* * * * *



विजय काचरे

प्रकाशित साहित्य

- सव्यापसव्य (कथासंग्रह) १९८०
- वाचनोपनिषद (समीक्षालेख संग्रह) २००३
- पर्यावरणशास्त्र (पाठ्यपुस्तक) २००५
- क्रान्तिवीर वसंतराव नाईक ः काल आणि कर्तृत्व
  चरित्र ः प्रकाशक राजहंस प्रकाशन पुणे २०१२
- भव्य दिव्य अवाढव्य ः ई साहित्य प्रतिष्ठान २०१४

**सम्पर्क पत्ता ः विजय काचरे**

डी -१७ गुरू गणेश नगर

कोथरूड पुणे ४११ ०३८

मोबाईल ः ९८ २२ १६ २१ ८१

विरोप पत्ता ः vijaykachre@gmail.com

**(लासलगाव महाविद्यालयात मराठी विभाग प्रमुख ः १९७३ ते २०१०)**